# भांडवलशाही साम्राज्य आणि पर्यावरण संकट

लेखक
डॉ. नाजनीन सआदत
सय्यद सआदतुल्लाह हुसैनी

अनुवाद
डॉ. एम. यु. कहाळे

# विषय सूची

# प्रस्तावना

वर्तमान भांडवलशाही साम्राज्याने मानवतेला जे विनाशकारी उपहार दिले आहेत त्यापैकी एक मोठा उपहार 'पर्यावरण संकट' होय. भौतिकवादाचा विळखा, लोभ-लालसा आणि भोग-विलासावर आधारित आर्थिक जीवनशैलीने मागील शतकांमध्ये जे पर्यावरणीय संकट निर्माण केले आहे, त्याचाच परिणाम आहे की आज मानवतेच्या अस्तित्वालाच धोका निर्माण झाला आहे. आमचे वायुमंडळ विषारी झाले आहे. पाण्याचे भांडार नष्ट झाले आहेत. आमचे खाद्यान्न वेगवेगळ्या प्रदूषणांनी ग्रसित झाल्यामुळे रोज नवीन रोगांना आक्रमणास प्रोत्साहित करीत आहेत. यामुळे स्वास्थ निरोगी राहिले नाही. जर वातावरणात अशाच प्रकारे बिघाड होत राहिला तर पुढे येणाऱ्या आमच्या वंशाला पौष्टिक आहार, स्वच्छ व निरोगी पाणी आणि जीवनास आवश्यक शुद्ध हवा मिळणे असंभव होईल.

ही अत्यंत आश्चर्यजनक आणि दुदैवी बाब आहे की विनाशाची लक्षणे पूर्णपणे दृष्टीगोचर झाल्यावरही भांडवलशाही साम्राज्याचे समर्थक यांना मानवतेच्या रक्षणार्थ दूर करण्यास तयार नाहीत. भौतिक विलासी प्रवृत्ती, लोभ व लालसा इतक्या चरमसीमेवर पोहचल्या की मानवतेची भजने गाणारे लोकच मानवतेच्या बलिदान भट्टीवर आपल्या व्यापारिक प्रगतीच्या भाकऱ्या भाजू इच्छितात.

पर्यावरण संकटामुळे एकीकडे ग्लोबल वार्मिंग, ऋतुबदल, वायु प्रदूषण आणि दूषित पाणी यांसारखे गंभीर संकट उत्पन्न होत आहे. तर दुसरीकडे प्राकृतिक संसाधनांमध्ये कमी होत आहे. याच्या परिणामात जीव-जंतु आणि वृक्षे व रोपट्यांच्या असंख्य प्रजाती लुप्त व नष्ट होत आहेत. याचे दुरोगामी परिणाम तर संपूर्ण मानवतेला सोसावे लागत आहेत, परंतु याचे तात्कालिन गंभीर दुष्परिणाम मात्र गरीब जनतेला सोसावे लागत आहेत.

# अनुवादकाचे मनोगत

आज मानवजात अनेक समस्यांनी वेढली गेली आहे. एक सर्वसाधारण मनुष्यही याला आपल्या निर्मिक अल्लाहचा प्रकोप म्हणतो आहे. अल्लाह अत्यंत दयाळु आहे तो अत्याचार करणारा नव्हे. तो आपल्या प्रत्येक दासावर जन्मदात्या आईच्या प्रेमापेक्षा जास्त प्रेम करणारा आहे. आज ऋतुमधील बदल, वातावरणातील दूषित हवा, समुद्रातील पाण्याचे विषारी होणे, जमिनीच्या गाभाऱ्यात होणारी अनैसर्गिक गतिविधी इत्यादी सर्व मनुष्याच्या कर्तृत्वाचा परिणाम होय. सृष्टीच्या निर्मिकाने आपल्या अंतिम मार्गदर्शक ग्रंथात मानवाला आगाऊ सूचना देऊन सावध केले ते या शब्दांत,

"खुष्की व समुद्रावर उपद्रव माजले आहेत, लोकांच्या आपल्या हातांच्या कमाईने जेणेकरून चव चाखवावी त्यांना त्यांच्या काही कृत्यांची, कदाचित ते परावृत्त होतील."

(दिव्य कुरआन - ३०:४१)

अल्लाहने मनुष्याला या सृष्टीवर खलीफा म्हणून नियुक्त करुन ही सकल चराचर सृष्टी अमानत म्हणून त्याच्या अधिपत्यात दिली. याचसोबत त्याला जीवन व्यतित करण्यास पूर्ण मार्गदर्शन करुन सांगितले की हे भौतिक जीवन केवळ तुमची परीक्षा घेण्यासाठी देण्यात आले आहे. आज जागतिक मानवतेला भेडसावीत असलेल्या अनेक समस्यांपैकी एक समस्या पर्यावरण संकट होय. याचे गंभीर परिणाम विश्वभरातील मानवजातीला भविष्यात भोगावे लागतील. आज या संकटामुळे केवळ गरीब जनताच त्रस्त आहे, म्हणून तथाकथित प्रगतिशील व मानवाचे हितचिंतक म्हणविणाऱ्या देशांना या संकटाची मुळीच चिंता नाही.

या पुस्तिकेला 'जमाअत-ए-इस्लामी हिंद'ने जनजागृतीच्या उद्देशाने प्रकाशित केले होते. इ. सन २००८ मध्ये प्रकाशित या पुस्तिकेला त्यानंतरच्या मानवी प्रयत्नांचा समावेश करुन मराठी भाषिक जनसामान्यांना पर्यावरण संकट, त्याचे होणारे भयंकर परिणाम, त्याची कारणे आणि उपाय याविषयी जागृत करण्यासाठी या पुस्तिकेला मराठी भाषेतून प्रकाशित करण्यात येत आहे. कारण आज पर्यावरण संकट एक भयंकर रुप धारण करीत आहे. जनतेला याविषयीचे ज्ञान असल्याशिवाय जागृती होणार नाही. जागृतीशिवाय मानवी कल्याणासाठी ते प्रयत्नशील होऊ शकत नाही. प्रत्येक मनुष्याचे हे कर्तव्य आहे की त्याने आपल्याजवळ असलेल्या ईश्वराच्या या अमूल्य ठेवेची जाण ठेऊन या सृष्टीचे संरक्षण करावे आणि याचा वापर अगदी ईशआदेशानुसारच करावा.

**- डॉ. एम. यु. कहाळे**

# पर्यावरण संकट

पर्यावरण संकट म्हणजे प्रकृती किंवा निसर्ग यामधील उपलब्ध प्राकृतिक संतुलनामध्ये बिघाड निर्माण होणे होय. सृष्टीच्या रचयिता अल्लाहने प्रकृतीच्या संरचनेत आश्चर्यजनक संतुलन स्थापित केले होते. पवित्र कुरआनमध्ये सांगितले आहे,

"आकाशाला त्याने उंच केले आणि संतुलन प्रस्थापित केले. याची निकड अशी आहे की तुम्ही संतुलन बिघडऊ नका." (दिव्य कुरआन, ५५:७-८)

मानवी हस्तक्षेपामुळेच प्रकृतीचे हे संतुलन बिघडत जात आहे. निसर्गाद्वारे स्थापित संतुलन असंतुलित होऊन पर्यावरण विकृत होत आहे.

प्रकृतीमधील निम्नलिखित महत्त्वपूर्ण बदलाच्या हवाल्याने हे सहज आत्मसात केले जाऊ शकते.

ऋतु परिवर्तन (Climate change)

वायु प्रदूषण (Air Pollution)

ओझोनमध्ये छिद्र (Ozone Depletion)

जल प्रदूषण (Water Pollution)

वृक्ष आणि जीव-जंतुची हानी (Bio-diversity)

ऊर्जा आणि प्राकृतिक संसाधनांचे नुकसान

# ऋतु परिवर्तन

सृष्टीचा रचयिता सर्वोच्च अल्लाहने भूतलावरील तापमान एका विशिष्ट स्तरावर स्थिर राहण्यासाठी एक संतुलित व्यवस्था स्थापित केली आहे. सूर्यापासून जमिनीला शक्ती मिळते, ज्यामुळे ती उष्ण होते अथवा तापते. या प्राप्त शक्तीचा एक हिस्सा जमीन उत्सर्जित करते. वायुमंडळात उपलब्ध गॅस या शक्तीला शोषूण घेतात. या गॅसेस 'ग्रीन हाऊस गॅसेस' म्हणून ओळखल्या जातात. यांच्याद्वारे जमिनीपासून परत केलेली शक्ती शोषणाच्या क्रियेमुळे जमिनीवरील उष्णता स्थिर राहते. कार्बन डाय ऑक्साइड, मिथेन, नायट्रस ऑक्साइड, हायड्रो फ्लोरो कार्बन, सल्फर, हेक्सा फ्लोरो ऑक्साइड आणि पाण्याची वाफ ही काही महत्त्वपूर्ण 'ग्रीन हाऊस गॅसेस' आहेत.

वातवरणात हा 'ग्रीन हाऊस' उपस्थित राहणे अत्यंत आवश्यक आहे, कारण यांच्या लुटीमुळे जमिनीवर उष्णता बाकी राहणार नाही. वायुमंडळात जर कार्बन डाय ऑक्साइडचे प्रमाण नसते तर जमिनीचे तापमान १८°C झाले असते जे फ्रीजच्या डीप फ्रीजरपेक्षाही कमी आहे. या तापमानात जीवनाचे अस्तित्व कठीण झाले असते.

या गॅसेसचे योग्य प्रमाणात होणेही अत्यंत आवश्यक आहे. प्रकृतीमध्ये यांचे संतुलन स्थिर राहण्यास अल्लाहने (जो या प्रकृतीचा रचयिता आहे) प्राकृतिक रुपात एक व्यवस्था स्थापन केली आहे. जीव-जंतु आपल्या श्वसन प्रक्रियेत प्राणवायु (Oxygen) घेतात आणि कार्बन डाय ऑक्साइड घेणे व प्राणवायु सोडण्याचे कार्य झाडे-झुडपे करतात, यामुळे प्रकृती (निसर्ग) मध्ये या जीवनाश्यक गॅसेसचे संतुलन स्थिर राहते.

मागील ३०० वर्षांत उद्योग क्षेत्रातील नेत्रदीपक प्रगतीमुळे कार्बन डाय ऑक्साइड आणि इतर ग्रीन हाऊस गॅसेस यांच्या उत्सर्जनात वाढ झाली आहे, तर दुसरीकडे जंगले आणि झाडे यांना कापण्याच्या प्रक्रियेत वाढ झाल्यामुळे या ग्रीन हाउस गॅसेसला शोषणाची क्रिया मंदावली. वायुमंडळात जर कार्बन आणि ग्रीन हाउस गॅसेस यांचे प्रमाण वाढले तर शेकडो वर्षांपर्यंत ते वायुमंडळात शिल्लक राहतात. याचाच परिणाम आहे की सूर्याच्या उष्णतेला शोषणाची आणि जमिनीला उष्ण करण्याच्या क्रियेतही वाढ झाली आहे.[१]

यापूर्वी आम्ही हे नमूद केले आहे की कार्बन-डाय-ऑक्साइडचा अंश जमिनीवर नसता तर जमिनीचे सरासरी तापमान १८°C एवढे असते. वायुमंडळात याच गॅसचे प्राकृतिक प्रमाण ३७५ पी.पी.एम. (Parts per Million) इतके आहे. या प्राकृतिक

१) IPCC, 4th Assesment Report, - P. 94.

प्रमाणात जमिनीचे तापमान सरासरी १४°C वर स्थिर राहते. बेधडक औद्योगिक हालचाली, वायु प्रदूषण, मोटार गाड्यांचे वाढते प्रमाण आणि जंगल कापणे इत्यादी कृत्यामुळे या प्रमाणात २.५४ पी.पी.एम इतक्या वार्षिक वेगाने वृद्धी होत आहे.[१] अठराव्या शतकाच्या मध्यापासून आतापर्यंत कार्बन डाय ऑक्साइडच्या प्रमाणात ३० टक्के आणि मिथेनच्या सरासरीत १४८ टक्के वृद्धी झाली आहे. वैज्ञानिकांचे अनुमान आहे की या वेगाने इ. सन २१०० पर्यंत कार्बन डाय ऑक्साइडचे प्रमाण ५४१ वरून ९७० पी.पी.एम.पर्यंत वाढेल.[२]

जमिनीचे सरासरी तापमानात वृद्धी एक घातक प्रक्रिया आहे. याच्या परिणामात असे चक्र (Circle) निर्माण होण्याची संभावना वाढते आणि यामुळे परिस्थितीत अतिशय बिघाड निर्माण होऊन जीवनाचे अस्तित्वच दुर्लभ होईल. इ. सन १८५० पूर्वीच्या दोन हजार वर्षांत काही क्षेत्रातील आंशिक वृद्धी वगळता सरासरी तापमान समान राहिले. इ. सन १९०६ ते २००५ या काळात सरासरी तापमानात ०.७४°C ने वृद्धी झाली. या शतकाच्या पूर्वार्धात वृद्धीचे प्रमाण ०.०७°C प्रति दशक होते. परंतु उत्तरार्धात ही वृद्धी द्विगुणित होऊन ०.१३°C प्रति दशक झाली. [३]

आज आम्हाला ऋतुबदल स्पष्टपणे जाणवत आहे. वास्तविक हा परिणाम आहे तापमानवृद्धीचा. मानवी इतिहासात इ. सन १९९० चे दशक सर्वांत जास्त उष्ण दशक होते. इ. सन १९९८, २००२, २००३, २००४ आणि २००५ मानवी इतिहासातील सर्वांत जास्त उष्ण वर्ष होते.[४] आजपर्यंतच्या मानवी इतिहासात इ. सन २०१० ला सर्वांत जास्त उष्ण वर्ष घोषित करण्यात आले. (The Gardian, London, 20 Feb, 2011)

तापमान वाढले म्हणजे ऋतुचे संतुलन बिघडते. उष्णता अधिक होऊ लागते. वर्षा ऋतुचा काळ आणि त्याचा तपशील, तसेच वर्षा होण्याच्या प्रमाणात बदल होतो. कुठे पूर येतो तर कुठे कोरडे राहते. बर्फाच्छादित पहाडांतील बर्फ वितळू लागतो. समुद्रातील पाण्याचे बाष्पीभवन झाल्यामुळे ग्रीन हाउस गॅसमध्ये अधिकच वृद्धी होते. ही वृद्धी वर्षा ऋतुच्या तपशीलात अधिकच भर घालते. अशा प्रकारे एक विनाशकारी प्रक्रिया सुरु होते, जी स्वत: उत्पन्न होते आणि स्वत:हून वाढत जाते.

---

१) mindprob.com/environment/kyoto.html

२) IPCC, 'Climate Change 2007 Synthesis Report', Geneva (2007), P - 37

३) वही, पृष्ठ ३०

४) WWF, Atlas of the Environment, Prentice Hall Press, 1990, P - 93

उष्णता वाढल्याने समुद्रातील पाणी प्रसरण पावते, त्यामुळे पाण्याची पातळी वाढते. तटवर्ती भागात पाणी शिरते आणि टापू (भूभाग) बुडण्याची दाट शक्यता असते.

ऋतुंच्या या परिवर्तनामुळे जीव-जंतु, वनस्पती आणि बॅक्टेरियाच्या अनेक प्रजाती नष्ट होऊ शकतात. या वेळी १५० ते २०० प्रजाती प्रत्येक दिवशी नष्ट होत आहेत. प्राकृतिक रुपाने या विभिन्न प्रजाती एक-दुसऱ्याचे संतुलन स्थिर ठेवतात. याचे एक स्पष्ट उदारहण म्हणजे समुद्राचे खारटपण आणि आम्लता आहे. वायुमंडळात शिल्लक राहिलेल्या अनावश्यक गॅसचा एक भाग समुद्राचे पाणी शोषूण घेतो. या गॅसेसची पाण्यासोबत रासायनिक प्रक्रिया होते व समुद्राच्या पाण्याची आम्लता या वाढत्या आम्लतेत अनेक जलीय जीव आणि वनस्पती जिवंत राहू शकत नाहीत. अशा प्रकारे त्यांच्या प्रजाती नष्ट होऊ लागतात.

मानव जीवनात विभिन्न बॅक्टेरियांचे अतिशय महत्त्व असते. अनेक निरोगी बॅक्टेरियां आजार पसरविणाऱ्या किटाणूंना आपल्या ताब्यात ठेवतात. काही रोगांच्या बॅक्टेरिया वाढीव तापमानातच जिवंत राहतात आणि वाढतात. जेव्हा अप्राकृतिक रुपाने तापमान वाढते तेव्हा एकीकडे विनाशक किटाणू वाढतात तर दुसरीकडे स्वास्थ्यवर्धक बॅक्टेरिया नष्ट होऊ लागतात. याच्या परिणामात जागतिक पातळीवर जनस्वास्थ्यसंबधी समस्या, शेती आणि धान्य यांचे संकट उत्पन्न होऊ शकते.

या जल-वायु परिवर्तनाची सर्वांत चिंताजनक विशेषता म्हणजे त्यांची शृखंलाबद्ध प्रतिक्रिया (Chain Reaction) आहे. ऋतुंचे साधारणसे परिवर्तन दुसऱ्या मोठ्या परिवर्तनाचे कारण बनते. अशा प्रकारे तीव्र गतीने स्थिती विस्फोटक बनते. या विशेषतेला निम्नलिखित उदाहरणाद्वारे सहज समजता येते.

१) तापमान वाढल्याने समुद्राचे पाणी तापते. उष्ण पाणी जास्त कार्बन डाय ऑक्साइड ठेऊ शकत नाही, त्याला ते उत्सर्जित करावे लागते. यामुळे वायुमंडळातील कार्बन डाय ऑक्साइड वाढते आणि मग वायुमंडळातील तापमान अधिकच वाढते.

२) उत्तर ध्रूव भागात उष्णतेमुळे बर्फ वितळू लागले आहे. त्याच्या वितळण्याने कार्बन डाय ऑक्साइडमुळे ५० पट जास्त उष्णता निर्माण करणारी गॅस मिथेन निघते. यामुळे वायुमंडळ अधिक जास्त गरम होते. परिणामात बर्फ वितळण्याची प्रक्रियेत अजून तीव्रता येते.

३) वायुमंडळ कार्बन डाय ऑक्साइडमुळे तापते. त्याच्या उष्णतेने पाणी वाफ बनून वायुमंडळात मिसळते. वाफ स्वत: ग्रीन हाऊस गॅस असल्यामुळे उष्णता जास्त

तीव्रतेने वाढते.

अशा प्रकारे ही शृंखलाबद्ध प्राकृतिक क्रिया कधीही अचानक स्फोटक होऊ शकते आणि त्यामुळे स्थिती आवाक्याबाहेर होण्याची दाट शक्यता आहे. वैज्ञानिकांच्या मते ऋतु परिवर्तनाची प्रक्रिया एक अशी प्रक्रिया आहे जी प्रारंभी अनुभवास येत नाही. परंतु तीव्र गतीने वाढत जाते आणि अचानक स्फोटानिशी घातक होऊ शकते.

जर जमिनीचे सरासरी तापमान ५°C ने वाढले तर जमिनीवर जीवन नष्ट होईल. वर्तमान स्थितीत ज्या वेगाने यात वृद्धी होत आहे ते बघता बघता जमिनीचे तापमान घातक टोकाला गाठेल.[१] कार्बन डाय ऑक्साइडचे प्रमाण जर एक प्रतिशत झाले तर जमिनीच्या पृष्ठभागाचे सरासरी तापमान १००°C इतके होईल आणि या तापमानावर पाणी उकळू लागते.[२]

आमच्या देशातही या ऋतु परिवर्तनाचा प्रभाव स्पष्टपणे अनुभवास येत आहे. सर्वच शहरांचे तापमान वाढत आहे. आमच्या देशातील अधिकांश शहरांचे जास्तीतजास्त तापमान इ. सन २०१५ पर्यंत ४°C ने वाढू शकते. याचा अर्थ हा आहे की दिल्लीमध्ये ग्रीष्म ऋतुमध्ये तापमान ५०°C पर्यंत पोहचू शकते. आगामी वर्षात वर्षा ऋतुमध्ये सरासरी १५ दिवसांची कपात होऊ शकते. हिमालयाच्या ग्लेशियरांचे बर्फ वितळून भारताच्या उत्तर आणि पूर्व भागांत सतत पूरतुल्य स्थिती निर्माण करु शकते. ऋतु परिवर्तनाच्या परिणामात देशाच्या अधिकांश भागांत वर्षभर मलेरिया आणि डेंग्यूच्या विषाणूंच्या संख्येत वाढ होऊ शकते.[३]

---

१) Nick Sterm, Sterm Review on the Economics of Climate Change, Cambridge University Press, Cambridge (2006), P-1

२) वही

३) Vijaya Gupta, 'Climate Change and Domestic Mitigation Efforts', Econom- Pol. Weekly, Vol-40, No.10, P-981-7

# वायु प्रदूषण

ग्रीन हाउस गॅसेसच्या वाढत्या प्रमाणासोबत भांडवलशाही साम्यवादी साम्राज्याने भोग-विलासपूर्वक जीवनशैलीला प्राधान्य दिल्यामुळे अन्य विषारी गॅस वायुमंडळात आपले प्रमाण सतत वाढवित आहेत. यापैकी काही महत्त्वपूर्ण गॅसेसची नावे आणि त्यापासून निर्माण होणाऱ्या रोगांची नावे निम्नलिखित सूचित प्रस्तुत आहे.

| प्रदूषण (मलीनता) | स्त्रोत | प्रदूषणनिर्मित रोग |
|---|---|---|
| नायट्रोजन ऑक्साईड | वाहने | फुप्फुसाचा विनाश, श्वसनाचे विकार |
| कार्बन मोना ऑक्साईड | कोळसा, तेल जाळण्याची क्रिया, उद्योग-धंदे | मेंदूचा रक्तस्राव प्राणवायुच्या पूर्ततेत अडथळा |
| लेड | गाड्या (वाहने) | शरीराच्या प्रत्येक अंगाला दुखापत देणारा |
| हायड्रोकार्बन | उद्योग-धंदे | मळमळ, वांती, थकवा आणि कर्करोग (कॅन्सर) इत्यादी |

वायुमंडळात तरंगणारे कण 'RSPM' विश्व स्वास्थ्य संघटन (WTO) च्या मापदंडानुसार १५० $Mg/M^3$ पेक्षा जास्त असू नयेत. आमच्या देशातील चार मोठ्या शहरांमध्ये याचे सरासरी प्रमाण ३६० $Microgram/M^3$ आहे. या प्रदूषणासोबत अजूनही काही विषारी आणि कर्करोग निर्माण करणारे पदार्थ आमच्या वायुमंडळात उपस्थित आहेत.[१]

१) Kerala Economic Review - 2008, KSPB, Thirurananthapuram, 2008. P - 147

# ओझोनचे छिद्र (Ozone Depletion)

सृष्टी रचियता अल्लाहने जमिनीच्या चारही बाजूने ओझोन गॅसची एक परत निर्माण केली आहे. ओझोनचा हा थर एका चाळणीचे काम करतो. ओझोनचा हा पृष्ठभाग सूर्याचा प्रकाश आणि उष्णतेला जमिनीवर येऊ देतो, परंतु घातक 'पराबैंगणी किरणे' (Ultraviolet rays) जी सूर्यप्रकाश आणि उष्णतेबरोबर निघतात त्यांना जमिनीवर येऊ देत नाही. ही पराबैंगणी किरणे मनुष्य, जीव-जंतु आणि वनस्पतीसाठी अतिशय हानिकारक आहेत. ही किरणे मनुष्याच्या त्वचेच्या कोशिकांना कर्करोगग्रस्त करु शकतात. याशिवाय मनुष्याची रोगप्रतिकारशक्ती क्षीण करुन अनेक आजाराचे कारण बनतात.

पराबैंगनी किरणांमुळे डोळ्यांतील मोतीबिंदूचे प्रमाण वाढल्याचेही नोंद करण्यात आले आहे.[१]

ही किरणे वनस्पतीच्या वृद्धीला प्रभावित करतात. तांदूळ आणि दुसरी अनेक रोपटी नाइट्रोजनची गरज विशेष प्रकारच्या बॅक्टेरिया- 'साइनोबॅक्टेरिया'द्वारे पूर्ण करतात. हे बॅक्टेरिया या वनस्पतीच्या मुळातच उपलब्ध असतात. ही पराबैंगणी किरणे या बॅक्टेरियाला नष्ट करतात, यामुळे तांदूळ इत्यादी पिके पूर्णपणे नष्ट होऊ शकतात.[२]

उपरोक्त ग्रीन हाउस गॅसेस आणि विशेषकरून एअरकंडिशनर्स आणि रेफ्रीजरेटर यामधून निघणारी क्लोरोफ्लोरो कार्बन गॅसेस उपरोक्त ओझोनसोबत प्रतिक्रिया करून यामध्ये छिद्र करतात.

मागील दोन-तीन शतकांतील औद्योगिक हालचालीच्या परिणामात ओझोनच्या लहरीत एक अथांग छिद्र निर्माण झाले आहे. इ. सन २००६ मध्ये या छिद्राच्या क्षेत्रफळाचे जे अनुमान लावण्यात आले होते ते २९ मिलीयन वर्ग किलोमीटर इतके होते. हे छिद्र सतत वाढतच जात आहे. या छिद्रासोबत ओझोनची पूर्ण परत (थर) बारीक होत आहे. इ. सन १९७० च्या दशकापासून ओझोनचे घनत्व ४ प्रतिशत प्रति दशकाच्या सरासरीने कमी होत आहे.[३]

---

१) Taylor et.al, 'Effect of Ultraviolet Radiations on Cataract Formation', New England Journal of Medicine, 1988, 319, 429 - 33.

२) Vaishampayan et. at. 'Cyanobacterial Biofertilizers in Rice Agriculture', The Botanical Review, Oct, 2001

३) पाहा नासाची वेबसाइट :- http://02onewatch.gsfc.nasa.gov/

# जल प्रदुषण

हवे नंतर पाणी मनुष्याची सर्वांत मोठी गरज आहे. जगात दरवर्षी २११ कोटी लोक दूषित पाण्याच्या वापराने होणाऱ्या रोगाने मृत्यू पावतात. १८ लक्ष मुले दरवर्षी अतिसाराने मृत्यू पावतात. पाण्यामुळे होणाऱ्या रोगामुळे विश्वातील मुलांचे ४४.५ कोटी शालेय दिवस नष्ट होतात. या वेळी ते शाळेत जाऊ शकत नाहीत. जगातील २० टक्के निर्धनतम लोकांमध्ये केवळ २५ टक्के लोकांना नळाच्या पाण्याची सुविधा प्राप्त आहे. प्रत्येक समयी विकसनशील देशाची निम्म्यापेक्षा जास्त जनता प्रदूषित पाण्याद्वारे निर्मित कोणत्या न कोणत्या रोगाने त्रस्त असते.(१)

साधारणपणे या स्थितीला वाढती लोकसंख्या जबाबदार असल्याचा दिशाभूल करणारा प्रचार केला जातो, परंतु वास्तविकता ही आहे की याचे कारण श्रीमंत व गरीब यामधील भेदभाव मोठ्या कंपन्यांची इच्छा-आकांक्षा आणि वायफळ खर्ची सारखी कार्ये आहेत. विकसीत देशाशी संबंधीत जगातील २० टक्के सर्वात जास्त धनी लोक जगातील ८५ टक्के पाणी वापरतात.(२) हे पाणी पंचतारांकित हॉटेलातील गिजरमध्ये वाफ बनून व्यर्थ जाते. स्वीमिंग पूल, वॉटर पार्क आणि जल क्रीडेची दुसरी केंद्रे आणि अशाच प्रकारच्या वायफळ खर्चात नष्ट होते. पाण्याच्या खाजगीकरणामुळे मोठमोठ्या कंपन्या जलस्त्रोतावर आपला अधिकार स्थापन करतात. या कंपनीचा उद्योग वर्षाकाठी २०० मिलीयन डॉलरपर्यंत पोहचला आहे. सत्यता ही आहे की हे जगातील लोकसंख्येच्या ७ टक्के भागाचीच आवश्यकता पूर्ण करतात.(३)

आमच्या देशातही पाण्याची समस्या गंभीर होत चालली आहे. इ. सन १९४७ मध्ये प्रति व्यक्ती ६००८ वर्ग मीटर पाणी उपलब्ध होते. इ. सन १९९७ मध्ये ते कमी होऊन २२२६ वर्ग मीटर इतके राहिले आणि इ. सन २०११ च्या जनगणनेनुसार हे कमी होऊन १५४५ वर्ग मीटर इतके राहिले. औद्योगिक प्रदूषणामुळे आमच्या देशातील बहुतेक नद्या अत्यंत निकृष्ट स्थितीत आहेत. यमुना दिल्लीत दाखल होताच १७० कोटी लीटर घाण पाणी (Untreated Sewage) रोज मिसळण्यात येते. याशिवाय जवळपास ९३१०० कारखान्यांचा कचरा रोज यमुना नदीत दाखल होत असतो. अशा प्रकारे

१) UNDP, HDR 2006, P-6, 7 & 35

२) Mande Barlw, 'Water as Commodity, the Wrong Preception', The Institute of Food & Development Policy, Summer 2001, Vol.7, No.3

३) John Taghabue, 'As Multinationals Run the Taps, Anger Rises Over Water for Profit', New York Times, August 26, 2002.

यमुना नदीचा BOD ५९ माइक्रोग्राम प्रति लीटर तर २००६ मध्ये यात लक्षणीय वाढ होऊन ते ११४ माइक्रोग्राम प्रति लीटर इतके झाले.[१] अमेरिकेतील गटराचे पाण्याची सरासरी बी.ओ.डी २०० माइक्रोग्राम प्रति लिटर आहे.

आमच्या देशात जमिनीच्या पृष्ठ भागावर आढळणाऱ्या पाण्याचा ७० टक्के भाग प्रदुषित आहे. दुय्यम दर्जाच्या शहरात (अपेक्षाकृत लहान शहर) ९५ टक्के पाणी प्रदूषित आहे.

५० टक्यापेक्षा जास्त उद्योगाद्वारे निर्धारित मानदंडापेक्षा जास्त प्रदूषित पदार्थांना पाण्यात वाहून देतात.[२]

---

१)Ashish Kothari et. al, 'Environment Background and Perspective @infochangindia.org'
२) वही

# जैविक हानी (Biodiversity)

सृष्टीचा निर्मिक अल्लाहने कोणतीही निरुपयोगी वस्तू बनविली नाही. पवित्र कुरआन याची स्पष्टोक्ती करतो,

"हे पालनकर्त्या, हे सर्वकाही तू व्यर्थ व निरुद्देश्य बनविलेले नाही."

(दिव्य कुरआन, ३:१९१)

जमिनीतून उगवणारे वृक्ष-झुडपे, पशू आणि जीव-जंतुच्या प्रत्येक प्रजातीला या सृष्टीत कोणते न कोणते महत्त्वपूर्ण कार्य सोपवण्यात आले आहे. अर्थात हे सर्व या सृष्टीचा कारभार सुरळीत आणि व्यवस्थित चालविण्यास मदत करतात. या प्रजातीचा विनाश म्हणजे त्यांच्यावर सोपविलेले कार्य बंद करणे अथवा थांबणे होय. याच्या परिणामत: मनुष्यासह संपूर्ण ब्रम्हांडाची प्रत्येक वस्तु संकटात पडेल. समुद्रातील लहान-लहान प्लवक Plankstone वायुमंडळातील कार्बन डाय ऑक्साइडचे संतुलन स्थिर ठेवण्यात महत्त्वपूर्ण भूमिका निभावतात. समुद्राचे तापमान वाढल्याने हे नष्ट होतात. त्यांच्या विनाशाला वायुमंडळामध्ये ग्रीन हाउस गॅसेसचे प्रमाण आणि उष्णता वाढल्याचे एक प्रमुख कारण मानले जाते. उंदरांना खाणारे सर्प आणि डासांची अंडी खाणारे बेडूक यांच्याविना मानवाचे जीवन दुर्लभ आहे. यांच्या अभावाने प्लेग आणि मलेरियासारखी महामारी अतिशिघ्र मनुष्याचे जीवन संपवते. यापैकी काही प्रजातीच्या कामाला आम्ही जाणतो परंतु वनस्पती आणि जंतु विशेषकरून आम्हाला न दिसणाऱ्या बॅक्टेरियांच्या कोट्यवधी प्रजाती आमच्या जीवनाची सुरक्षा आणि आमच्या अस्तित्वासाठी अल्लाहच्या आदेशाने शांततेने मौन कार्य करीत आहेत. त्यांची आम्हाला जाणीवही नाही. त्यांचा विनाश आमच्यासाठी कोणकोणत्या प्रलयात्मक संकटांना निर्माण करतात याचे अनुमानही आम्ही लावू शकत नाही.

पर्यावरण वैज्ञानिकांचा अनुमान आहे की आमच्या सृष्टीतून रोज १५० ते २०० वनस्पती आणि जीव-जंतुच्या प्रजाती नष्ट होत आहेत.[१] एका वेळी एक प्रजाती नष्ट झाली म्हणजे ती नेहमीकरिता नष्ट होते. वैज्ञानिकांच्या मते ज्या तीव्रतेने प्रजाती संपत आहेत, त्याचे दुसरे प्रमाण ज्ञात इतिहासात केवळ डायनॉसोर नष्ट होण्याच्या काळात सापडते.

---

१) Lamont BB (1995), 'Testing the Effect of Ecosystem Composition Structure on its Functioning', Oikos 74:283-295.

यानंतरच्या हजारो लाखो वर्षात प्राण्यांना कोणतेही मोठे संकट नव्हते. परंतु आता पुन्हा तीव्रतेने प्राण्यांच्या नष्ट होण्याच्या प्रक्रियेचा प्रारंभ झाला आहे. आमच्या देशातील जागतिक पातळीवरील जैविक प्रजातीच्या महत्त्वपूर्ण केंद्रांवर हे संकट जलद गतीने निर्माण होत आहे. येथे १० टक्के वृक्षे (झाडे-झुडपे) तर २० टक्के स्तनधारी (Mammals) यांच्या अस्तित्वावर संकटरुपी आकाश घिरट्या घालत आहे. चित्ता, एक शिंगाचा ऱ्हानियो, गुलाबी डोक्याचा बदक, पहाडी तित्तर, जंगली उल्लू इत्यादींसहित २३ पेक्षा जास्त प्रजाती संपल्या किंवा नष्ट झाल्यात.[१]

या प्रजातींना संपविण्यात औद्योगिकरण, जंगल कापणे, शिकार करणे, पर्यावरण प्रदूषण इत्यादी कारणांसोबत शेती करण्याच्या पद्धतीत भांडवलदारांनी आणलेला बदलसुद्धा जबाबदार आहे. कॉर्पोरेट ॲग्रीकल्चर, वीज आणि खते तयार करणाऱ्या कंपन्या मोठ्या प्रमाणात फळे आणि दुसरी धान्ये यांच्या तयारीत जीनसंबधी परिवर्तन (Genetic Modification) करतात. या बदलामुळे एक नवीन प्रजाती जन्माला येते आणि जुनी प्रजाती धोक्यात पडते. भारतीय शेतकरी जवळपास ६० हजार प्रकारचे तांदूळ पिकवितो. परंतु आता बीजांची निर्मीती करणाऱ्या विश्वस्तरीय कंपन्या त्यांना एकाच प्रकारचे तांदूळ उगविण्यास बाध्य करीत आहेत. फळांचे विभिन्न स्थानिक प्रकार नष्ट होत आहेत आणि विदेशी प्रकार त्यांची जागा घेत आहेत (जसे अमेरिकन सफरचंद). कोंबड्यांच्या हजारो प्रकारांऐवजी पोल्ट्रीची एकच पद्धत संपूर्ण देशाती प्रचलित होत आहे. पुढील काळात देशी कोंबड्याच्या विभिन्न जाती संपवण्याच्या संभावनेचा नकार करता येत नाही.

पर्यावरणासंबधी एक मोठी समस्या म्हणजे प्राकृतिक संसाधने विशेषत: ऊर्जासंकट होय. अल्लाहने मनुष्याची गरजपूर्तीसाठी या जमिनीवर अनेक साधने उपलब्ध केली आहेत. परंतु मनुष्याचा लोभ व लालसेची पूर्ती अशा प्रकारच्या कितीही पद्धतीने संभव नाही. 'लिविंग प्लानेट'च्या रिर्पोटनुसार मानवी समुदाय जमिनीच्या क्षमतेच्या ३० टक्केपेक्षा जास्त संसाधनाचा वापर करीत आहे. या गतीने २०३० पर्यंत आम्हाला दोन पृथ्वींची गरज पडेल.[२]

अमेरिका एकंदरीत तेलाचा २५ टक्के वापर करतो. मोठ्या शक्ती पूर्व-मध्य आशियाच्या देशावर दबाव टाकून जास्त तेल काढायला लावीत आहेत.[३]

---

१) Ashish Kothari et.al, 'Environment Background and Perspective@infochangindia.org'

२) Julitle Jawet "World is facing a Natural" Guardian 2-10-2008.

३) US to opec : produce more oil USA to day 21-01-2008.

# पर्यावरण संकट आणि जगातील गरीब जनता

पर्यावरण संकटाचा प्रभाव सर्वांवर पडतो परंतु गरीब जनता यामुळे जास्त प्रभावी होते. घरे, ऑफिसेस, मोटरगाड्या, शॉपींग मॉल इत्यादींमध्ये फिल्टरयुक्त एअर कंडीशनर्सचा वापर अगदी सर्रासपणे होत आहे. यामुळे श्रीमंत माणसाचा वायु प्रदूषणाशी संबध कमी येतो परंतु गरीब माणूस रोज दूषित वातावरणात श्वास घेण्यास बाध्य आहे.

रात्रं-दिवस एयर कंडीशनर्समध्ये राहणाऱ्या लोकांना वातावरणातील आकाशाला भिडणाऱ्या तापमापनाची जाणीव कमीच असते. या उच्चतम तापमानात गरीबच पोळला जातो. श्रीमंतांच्या मनोरंजनासाठी वस्तू तयार करणाऱ्या कंपन्या जो कचरा इत्यादी सोडून देतात त्याला पिऊन मृत्यू पावणे हेसुद्धा गरीबांच्याच नशिबी येते.

ऋतु परिवर्तनामुळे दुष्काळाची स्थिती निर्माण होते आणि शेतीवर सर्वात जास्त खेडूत आणि गरीब लोकच निर्भर असतात. दुष्काळामुळे महाराष्ट्रातील विदर्भात सरकारी आकड्यांनुसार २००० शेतकऱ्यांनी आत्महत्या करावी लागली.[१] दुष्काळामुळे खाद्यपदार्थांचे भाव गगनाला भिडतात त्यामुळे गरीब लोक उपाशी राहण्यास आणि उपाशी मरण्यास बाध्य होतात. अनेक जीवांच्या प्रजाती नष्ट अगर लुप्त होण्याचे नुकसानही गरीब शेतकऱ्यालाच सोसावे लागते. देशी कोंबडी संपली तर गरीब माणूस आपल्या घरी चार कोंबड्या पाळून त्यांची अंडी विकू शकणार नाही, कारण कोंबडी आणि अंड्यांचा व्यापार पोल्ट्री फार्मच्या श्रीमंत मालकाच्या ताब्यात असतो. प्राकृतिक रुपाने स्वत: प्राप्त होणारी साळ तसेच तांदळाच्या विभिन्न प्रजाती संपल्या तर शेतकरी आपल्या घरातील विनामूल्य प्राप्त बीज पेरून साळ उगवू शकत नाही. केवळ धनाढ्य शेतकरी बहुराष्ट्रीय कंपन्यांचे महाग बीज (जे केवळ एकाच पिकासाठी उपयुक्त आहे तेही विशेष प्रकारच्या महागड्या खतांद्वारेच पिकवले जातात) विकत घेऊन साळ पिकवू शकतात (तांदूळ) पिकवू शकतात. अशा प्रकारे पर्यावरण संकट जगातील गरीब जनतेचे जीवन दुर्लभ करते. जंगल, डोंगर आणि तेथील वातावरण आदिवासी आणि जनजातीसाठी विशेष महत्त्वपूर्ण आहे. त्यांची राहणीमान आणि रोजगार-धंदा शेकडो वर्षापासून त्यांच्याशी संलग्न अगर जुळलेला आहे. प्रगतीच्या नावावर जंगले ओसाड झाली तर या गरीबांचे तर उभे जीवनच उद्ध्वस्त होईल.

---

१) Jaideep Hardikar, 'One Suicide every 8 Hrs', DNA 26-8-2006.

# या परिस्थितीचे मूळ कारण

या परिस्थितीचे मूळ कारण 'तकासूर' अर्थात अधिक्यप्राप्ती अथवा जास्तीतजास्त नफा प्राप्त करुन घेण्याचा हव्यास होय. भांडवलशाही व्यवस्था या 'तकासुर'ला प्रोत्साहित करते. मोठ्या कंपन्या जास्तीतजास्त लाभ प्राप्त करण्याच्या आंकाक्षापूर्तीसाठी आपल्या निर्मिती (Production) ला पसरवितात. या हवसपूर्तीसाठी ते जाहिरात बाजाराची चमक-दमक, भोग-विलास, लोभ-लालूच यांना प्रोत्साहित करणाऱ्या पद्धती आणि संसाधनांचा वापर करुन लोकांमध्ये वायफळ खर्चाच्या भावनेला आपल्या सर्व सीमा ओलांडून पूर्णत्वास पोहचवितात. याचा परिणाम हा होतो की, लोक आपल्या आवश्यक गरजांपेक्षा कितीतरी जास्त खर्च करु लागतात आणि हा खर्च अनाठायी व अनावश्यक असतो. या खर्चाच्या परिणामात ऊर्जा, पाणी आणि दुसरे प्राकृतिक संसाधनाची नासाडी होते. जंगले कापली जातात आणि पाणी तसेच जलवायुमध्ये विषारी गॅसेस तसेच प्रदूषण पसरविणारे अन्य पदार्थ मिसळू लागतात. अशा प्रकारे हा 'तकासूर' संपूर्ण मानवजातीसाठी विनाशाचे कारण बनत आहे. सृष्टीचा रचयिता मानवाचा निर्मिक अल्लाह सांगतो,

"तुम्हा लोकांना अधिकात अधिक आणि एकदुसऱ्यापेक्षा जास्त धन प्राप्त करण्याच्या मोहाने बेसावध करून टाकले आहे" (दिव्य कुरआन, १०२:१)

अर्थात एक-दुसऱ्यापेक्षा जास्त संपत्ती (भौतिक सुख-सुविधा) प्राप्त करण्याच्या लालसेने तुम्हाला ठार करुन टाकले.

तीनशे घोड्यांची एक सैनिक तुकडी जितके कार्बन डाय ऑक्साइड सोडते तितके कार्बन डाय ऑक्साइड एक ३०० हॉर्स पावरची एक कार (जसे मर्सिडीज bhp 272) सोडते. मोटर कार आणि गॅसची विस्मयकारी जाहिराती आणि नवीन जीवनशैलीचे चित्ताकर्षक प्रस्तुतीकरण (Life Style Glamour) द्वारे लोकांना प्रोत्साहित करण्यात येते की घराच्या प्रत्येक सदस्याने कार वापरावी आणि तीसुद्धा जास्त हॉर्स-पॉवरची महागडी कार. एक गॅलैन (जवळपास ३७५ लीटर) गॅस लाइनच्या वापराने जो कार्बन डाय ऑक्साइड निर्माण होतो तो शोषण्यासाठी एका मोठ्या वृक्षाला एक वर्ष लागते.

पर्वी भोग-विलासाची साधने इतकी नव्हती जितकी ती आज आहे. म्हणून पूर्वी प्रकृतीचे संतुलन स्थिर रहायचे. आजही जर मनुष्याने अल्लाहने दिलेल्या बक्षिसांचा वापर काळजीपूर्वक आणि संतुलीत प्रमाणात केला तर आजही प्रकृतीचे संतुलन आणि अनुकुलता स्थिर राहू शकते. परंतु जेव्हा घराचा प्रत्येक मुलगा ३०० घोड्यांची फौज (३०० हॉर्स पॉवरची कार) घेऊन निघेल तेव्हा गाड्यांची विपूलता होणे सहाजिकच आहे.

आज रेफ्रीजरेशन आणि एअर कंडीशनिंग जीवनाश्यक वस्तुमध्ये सामील झाले आहे. प्राकृतिक संसाधनांना निष्ठुरतेने व्यर्थ खर्च केल्याने पर्यावरण संकट निर्माण होणे अगदी स्वाभाविकच होते. जगाच्या निर्मिकाने आपल्या अंतिम मार्गदर्शक ग्रंथात दिव्य कुरआनमध्ये म्हटले आहे,

"खुष्की व समुद्रावर उपद्रव माजले आहेत, लोकांच्या आपल्या हातांच्या कमाईने जेणेकरून चव चाखवावी त्यांना त्यांच्या काही कृत्यांची, कदाचित ते परावृत्त होतील."

(दिव्य कुरआन - ३०:४१)

तात्पर्य पर्यावरण संकटासाठी श्रीमंत देश आणि तेथील धनाढ्य रहिवासी मुळात जबाबदार आहेत. खालील तत्त्यामध्ये भिन्न-भिन्न वर्गामध्ये भौतिकतेवर खर्च करण्याच्या मनोवृत्तीला (Consumption Pattern) दर्शवण्यात आले आहे.






उपरोक्त तालिकेवरुन सहजच अनुमान होते की, पर्यावरण संकटास गरीब लोक मुळीच जबाबदार नाही. या संकटास जबाबदार तर ते लोक आहेत जे आपल्या विलासी वृत्तीच्या आहारी जाऊन आपल्या गरजा पूर्तीसाठी आवश्यकतेपेक्षा जास्त संसाधन आणि ऊर्जेचा वापर करत आहेत.

विश्वाचे २० टक्के धनी लोक जगाच्या ऊर्जेचा ५८ टक्के वापर करीत आहेत. २०टक्के निर्धन लोक केवळ ४ टक्के उर्जा वापरतात. जगात जेवढ्या गाड्या आहेत त्यापैकी ८७ टक्केचा वापर केवळ २० टक्के सर्वात जास्त धनाढ्य लोकच करतात. अतिनिर्धन २० टक्के लोक फक्त १ टक्के गाड्याच वापरतात.[१]

अमेरिकेत जेवढे वाहन चालकाचे परवाने आहेत त्यात सर्वात जास्त कारचे आहेत. याचा स्पष्ट अर्थ हा आहे की प्रत्येक व्यक्ती एकापेक्षा जास्त कार वापरतो.[२] अमेरिकेत गाड्यांची एकंदरीत संख्या जवळपास २५ कोटी इतकी आहे. ही संख्या तेथील लोकसंख्येपेक्षा थोडीच कमी आहे. अर्थात १००० मनुष्यांकडे ७६५ गाड्या आहेत. भारतामध्ये हे प्रमाण १००० पुरुषांमागे केवळ १२ गाड्या आहे. इथोपिया, नाइजेरिया, माली इत्यादीमध्ये १००० व्यक्तीकडे केवळ एकच गाडी आहे.[३]

वैज्ञानिकांच्या मते एक अमेरिकी गरीब देशाच्या एका नागरिकाच्या तुलनेत जगातील पर्यावरणाला सरासरी १०० पटीने जास्त हानी पोहचवतो. जर पूर्ण जगातील मानव अमेरिकेच्या राहणीमानाच्या फक्त १ टक्के आपले जीवनस्तर केले तर आम्हाला या जमिनीसारख्या पाच पृथ्वी आणि त्याचे संसाधन लागतील. याविपरीत जर प्रत्येक व्यक्ती एका बांगलादेशीसमान आपले जीवनस्तर करुन घेईल तर २२ मिलीयन (वर्तमान लोकसंख्येच्या ४ पट) मनुष्यासाठी ही पृथ्वी पर्याप्त होईल.[४]

सीमा उंल्लघन करुन जास्त खर्च करण्याच्या प्रवृत्तीने उपभोक्तांच्या हृदयात प्राकृतिक संसाधने आणि वस्तूंच्या उपभोगा प्रति निष्ठूरता निर्माण केली आहे. जितका खर्च होतो तितकाच व्यर्थही जातो. पंचतारांकीत हॉटेलच्या स्नानगृहातील गीजर २४ तास सतत सुरु असतात. (ग्राहकांना कोणत्याही वेळी गरम पाणी मिळावे यासाठी विनाकारण पाणी गरम होत राहते.) यामुळे जे पाणी वाफ बनून नष्ट होते तेच जर गोळा केले तर

---

१) UNDP, 'Consumption for human development' HRD 1998 Overview, P-2
२) US Dept. of Transportation, Federal Highway Admin: Highway Statistics2003 www.fhwa.dot.gov.
३) World Statistics Handbook 2007- United Nations, Statistics Division.
४) Clark Country, 'Solid Waste Management Plan', Washington Clark Country (2008) P-3-11.

कित्येक गरीब परिवाराला स्वच्छ पाणी मिळू शकते. अमेरिका आणि दुसरे विकसित देश एक तृतीयांशपेक्षा जास्त खाद्यान्न फेकून देतात.[१] अमेरिकेत वर्षाकाठी जो कचरा जमा होतो त्याला जर ट्रकामध्ये भरले तर १,४५००० (एक लाख पंचेचाळीस हजार) मैल लांब रांग लागेल.[२] (ही लांबी पृथ्वी आणि चंद्र यामधील अंतराच्या निम्मे आहे.) अमेरिकेत सील बंद केलेले जेवढे खाद्यान्न तयार होते त्यापैकी २७ टक्के तर कधी उपयोगातच येत नाही. कारखाने, दुकाने अथवा घरांतील रेफ्रीजरेटरमधून सील बंद स्थितीतच कचरा पेटीत पोहचते.[३]

या वास्तविक तथ्याने हे स्पष्ट होते की पर्यावरण संकटाचे मूळ कारण आवश्यकतेपेक्षा जास्त खर्च करणे, भोग-विलासी वृत्ती आणि व्यर्थ खर्चाची प्रवृत्ती आहे. भांडवलशाही समाजवाद व्यापारिक आणि औद्योगिक कंपन्यांना जास्तीतजास्त लाभ पोहचविण्यासाठी विज्ञापनाद्वारे वायफळ खर्चाची मनोवृत्ती जागृत करतो. व्यर्थ खर्चाची बेलगाम मानसिकता निर्माण करुन या कंपन्या अंधाधुंद औद्योगिकरण करतात. दुसरीकडे जंगले कापतात, आणि ऊर्जेचा निष्ठुरतेने वापर करून मोठ्या पातळीवर ग्रीन हाऊस गॅसैसचे उत्सर्जन करतात.

अमेरिकेने आतापर्यंत ग्रीन हाऊस गॅसेसचे जितके उत्सर्जन केले आहे ते जगातील दुसऱ्या देशाच्या तुलनेत सर्वात जास्त आहे, परंतु लोकसंख्येत मात्र मागे आहे. अर्थात जगाच्या लोकसंख्येची केवळ ५ प्रतिशत जनताच अमेरिकेची नागरिक आहे. कित्येक रिपोर्टद्वारे ही गोष्ट सिद्ध झाले आहे की अमेरिका जगात सर्वात जास्त ग्रीन हाउस गॅसैस उत्सर्जनाची जबाबदार आहे. वर्ल्ड रिसोर्स इंस्टीट्यूट (WRI) च्या रिपोर्टनुसार १९५० पासून आजपर्यंत ५०.७ बिलीयन टन कार्बन डाय ऑक्साइड वायुमंडळात एकट्या अमेरिकेने सोडला आहे. जेव्हा की, अमेरिकेपेक्षा ४.६ पटीने जास्त लोकसंख्या असूनही चीनने १५.७ बिलीयन टन तर अमेरिकेपेक्षा ३.५ पट जास्त लोकसंख्येच्या भारताने ४.२ बिलीयन टन तर कार्बन डाय ऑक्साइड वायुमंडळात सोडला.[४]

क्रिश्चियन ऐडच्या रिपोर्टनुसार विकसित देशांनी गरीब देशांना पर्यावरणाच्या क्षेत्रात जी हानी पोहचवली त्याची कमीतकमी किंमत ६०० मिलीयन डॉलर आहे जी गरीब देशावरील कर्जाच्या ३ पट आहे.[५]

---

१) 'United State throw away.....', Canada.com 22-08-2008.

२) Orange Coast Magazine, Dec-1997, P-57.

३) Newyork Times, Andrew Martin, 18-05-2008.

४) World Resource Institute@archive.wri.org/pagecfm?id=1284&z=?

५) Christion Aid report (1999) as quoted ingolbalissuses.org/print/oaticle/231.

# ऊर्जा संकट

तेलाच्या ज्या भांडारात तेलाच्या उपलब्धतेची खात्री असते अशा भांडारांना निश्चित अगर ठराविक भांडार (Proven Reserves) म्हणतात. यामधून वर्तमान टेक्नोलॉजीद्वारेच तेल काढणे संभव आहे.[१] पुढील ३० वर्षे ते चालू शकतात.

या आकड्यांवरही काही वैज्ञानिकांनी शंका व्यक्त करुन सांगितले की, तेल कंपन्या तेल भांडाराविषयी खोटे बोलतात. उदाहरणार्थ, 'सऊदी आरामको कंपनी'चे व्हाईस प्रेसिडेंट (उपाध्यक्ष) म्हणतात की, तेलाचे जे भांडार आहेत (Reserves) ते केवळ संसाधन (Resources) आहेत. या वेळी त्यांच्यापर्यंत पोहचणे आणि तेल काढणे संभव नाही.[२] इसवी सन २००४ प्रारंभी तेल कंपनी 'डचशेल' ने हे स्वीकारुन सर्वांना आश्चर्यचकीत केले की त्याच्या तेल आणि गॅसच्या ज्ञात भांडारातून एक चर्तुथांश भाग उपलब्ध नाही. तो खोटे बोलला. याचप्रमाणे टेक्सासची कंपनी 'एलपासो' ने आपले भांडाराविषयी घोषणा बदलून ४३ टक्के कमी केले अर्थात त्याने आपल्या भांडारातील उपलब्धीला ४३ टक्के वाढवून दाखविले होते.

---

१) Report of Energy Watch Group (2007).
२) Saad, Al-Hussainias quoted inaspo - usa.com/ archivesindex.php?option=co._cantents &task = view &id = 243&1temid=91.

# पर्यावरण संकट रोखण्याचे उपाय आणि साम्राज्य हस्तक्षेप

पर्यावरण संकट एक विश्वव्यापी समस्या आहे. याचा संबध संपूर्ण मानवजातीच्या अस्तित्वाशी संलग्न आहे म्हणूनच ही समस्या विश्व राजनीतीच्या एजंडेत स्पष्ट रुपाने सामील असते. पर्यावरण आणि पर्यावरण सुरक्षिततेशी संबंधित संस्था आपल्या पूर्ण शक्तीनिशी शासनाला या समस्येची गंभीरता आणि संवेदनशीलतेविषयी जागृत करण्याचा प्रयत्न करत असतात. यासाठी अनेक जागतिक सम्मेलनांमध्ये या समस्येवर गंभीरपणे विचारविमर्श झाला आहे.

जागतिक व्यापारावर प्रभावी भांडवलदार आणि त्यांचे पाश्चिमात्य स्वामी व संरक्षक पर्यावरण संकटाची समस्या सोडविण्याच्या प्रयत्नांमध्ये नेहमी अडथळा निर्माण करीत राहीले. याचे एक स्पष्ट प्रमाण म्हणजे क्योटो संधी आणि त्याविषयी पश्चिमी देशांची वर्तणूक होय.

क्योटो संधी अत्यंत गुंतागुंतीची आहे. यामध्ये विभिन्न देशांना ग्रीन हाऊस गॅसेसच्या उत्सर्जनात कमी करण्याचे लक्ष्य दिले गेले आहे. जो देश आपल्या निर्धारित लक्ष्यापेक्षा जास्त गॅस उत्सर्जन करत असेल तर त्याला आपल्या शेजारी देशाकडून लक्ष्य किमत देऊन विकत घ्यावा लागेल. याचा अर्थ हा होतो की लक्ष्य विकणाऱ्या देशाचे निर्धारित लक्ष्यामध्ये कमी येईल. यासाठी शेजारी देशाला संमत करावे लागेल म्हणजे जागतिक पातळीवर गॅस उत्सर्जनाचे निर्धारित प्रमाण स्थिर राहील. तात्पर्य हे की विकत घेणाऱ्या देशाच्या लक्ष्याचा एक भाग विकणारा देश पूर्ण करेल.

परंतु ही एक संधी लुळी सिद्ध झाली. पर्यावरण वैज्ञानिकांनी ग्लोबल वार्मिंगला प्राकृतिक मर्यादेत ठेवण्यासाठी या संधीला अपर्याप्त ठरविले. जागतिक पातळीवरील न्याय आणि समानतेची ध्वजावाहक संघटना आणि संस्था लक्ष्य विकत घेण्याच्या या पद्धतीला अतिशय अन्यायपूर्ण आणि अत्याचारपूर्ण ठरवितात, परंतु अमेरिका या लुळ्या लंगड्या संधीलाही मान्य करण्यास तयार नाही.

क्योटो संधीवर ८० पेक्षा जास्त देशांनी हस्ताक्षर केले आहे. जॉर्ज बुश सीनियरच्या नेतृत्वामध्ये अमेरिकेने इसवी सन१९९२ मध्ये या संधीवर हस्ताक्षर केले होते. मार्च १९९४ पासून ही संधी लागूही झाली होती, परंतु जॉर्ज बुश (ज्यूनियर) च्या नेतृत्वात अमेरिकेने २००१ मध्ये ही संधी तोडण्याची घोषणा केली. अमेरिकाचे हे म्हणणे आहे की गॅस उत्सर्जनाचे लक्ष्य प्रति व्यक्तीच्या आधारावर निर्धारित करु नये.

क्योटो संधीमध्ये संयुक्त परंतु विभेदात्मक (Common but differential) उत्तरदायित्वाच्या सिद्धांताशी सहमती दर्शविण्यात आली होती. याचा अर्थ हा होता की, ऐतिहासिक रुपाने विकसित देशांनी आतापर्यंत प्रच्युर मालेत ग्रीन हाऊस गॅसचे उत्सर्जन केले आहे. म्हणून उत्सर्जनात कमी ही त्यांचीच जबाबदारी आहे. यासाठी उत्सर्जनात कमीचे लक्ष्य प्रति व्यक्तीच निर्धारित करावे. भारत आणि चीनची लोकसंख्या जास्त आहे. लोकांच्या गरजा पूर्तीसाठी या दोन्हीं देशांना औद्योगिक क्षेत्रांना विस्तारीत करावे लागणारच, वाहनांची संख्येतही वृद्धी करावी लागेल. यामुळे ही गोष्ट अगदी तर्कसंगत आहे की ग्रीन हाऊस गॅसच्या उत्सर्जनात कमीचे लक्ष नॉर्वेपेक्षा कमी राहील कारण तेथील लोकसंख्या या दोन्ही देशाच्या तुलनेत अतिशय कमी आहे.[१]

जॉर्ज इब्ल्यू बुश ज्यूनियर यांचे प्रशासन या अगदी स्पष्ट आणि सरळ गोष्टीलाही मान्य करण्यास तयार नव्हते. बुश प्रशासनाचा हा हट्ट होता की भारत आणि चीनला त्यांच्या लोकसंख्येच्या अधिकतेचा लाभ मिळायला नको. अर्थात ग्रीन हाऊस गॅसच्या कमीचे लक्ष्य कमी व्हायला नको या हट्टामुळे अमेरिकेने संधी तोडली आणि आता कोणत्याही नवीन संधीसाठीही तयार नाही.

इसवी सन २००८ साली जापानमध्ये टोयाको शहरात 'जी-८' विकसित देशांचे प्रतिनिधींचे ३४ वे संमेलन झाले होते. त्यात प्रगतिशील देशांनी ग्रीन हाऊस गॅसचे उत्सर्जन कमी करण्यासाठी विकसित देशांनी लक्ष्य निर्धारित करावे यासाठी अतिशय प्रयत्न केले. संमेलन समाप्तीनंतर मोठ्या जोमाने घोषणा करण्यात आली की विकसित देश २०५० पर्यंत गॅस उत्सर्जन निम्मे करण्यास सहमत झाले. यजमान जापान ने घोषणा केली की हे संमेलन अतिशय सफल राहिले. नंतर जेव्हा या संमेलनाचे विस्तृत विवेचन प्रकाशित व प्रसारित झाले तेव्हा ही हास्यास्पद बाब समोर आली की गॅस उत्सर्जन निम्मे करण्यावर तर सहमती झाली परंतु ही पन्नास टक्के कमी कोणत्या वर्षाला आधार बनवून केली जाईल हे निश्चित होऊ शकले नाही. अर्थात ठराविक प्रमाणात उत्सर्जनात कमीची कालमर्यादा निश्चित करणे संभव नाही.

तात्पर्य या संम्मेलनाद्वारे लोकांच्या डोळ्यात माती घालण्याचाच प्रयत्न करण्यात आला. कोपेनहेगन मध्ये ७ ते १५ डिसेंबर २००९ च्या मध्यात विश्वातील नेत्यांचे एक महत्त्वपूर्ण संमेलन 'जलवायु परिवर्तन' अंतर्गत होत आहे. याविषयी भारताचे म्हणणे हे आहे की, हे संमेलन क्योटो संधोची पुढील कडी आहे. यामध्ये क्योटो संधीमध्ये निश्चित केलेले २०१२ च्या लक्ष्यापुढील लक्ष्य निर्धारित होणार आहे. परंतु अमेरिकेची

१) 'US Exit from Kyoto Procol' Hindu Businessline, April 18, 2001.

टळवाटळवी पूर्व नीतीच सुरु आहे. तो याच गोष्टीवर अडलेला आहे की, 'क्योटो' संधी संपली आता पूर्ण संधीवर नव्याने चर्चा व्हायला पाहिजे.

एकंदरीत अमेरिकेचे हावभाव हेच दर्शविते की जगातल्या सर्व नेत्यांना तो वायफळ चर्चेत गुंतवून कोणतेही सर्वसंमत लक्ष्य निर्धारित करण्याविषयी संधी होऊच देणार नाही.

बालीच्या संमेलनात जगभरच्या नेत्यांनी या गोष्टीचा प्रयत्न केला की मोठ्या-मोठ्या औद्योगिक कंपन्यांना पर्यावरणाच्या जबाबदारीविषयी काही गोष्टीत पायबंद घालावा. परंतु ब्रिटेन आणि अमेरिकेने याचा उग्र विरोध केला यामुळे ही युक्ती सफल होऊ शकली नाही. वास्तविक यूरोपियन युनियनचे समर्थन या नेत्यांना प्राप्त होते.[१]

ग्रीन हाऊस गॅसचे उत्सर्जन करणाऱ्यांच्या यादीत कॅनाडासुद्धा अमेरिका आणि ब्रिटेनसोबतच आहे. कॅनाडाचे प्रधानमंत्री मोठ्या बेपर्वाईने पर्यावरण प्रदूषणाविषयी सर्व सत्य तथ्यांना लपवित आहेत. विश्वातील सर्व पर्यावरण वैज्ञानिक ग्रीन हाऊस दुष्प्रभावाची एका सुरात घोषणा करीत आहेत परंतु वैज्ञानिकांच्या विपरीत कॅनेडियन प्रधानमंत्री याला एक कल्पित गोष्ट सांगत आहेत.[२] शेवटी इ. सन २०११ मध्ये कॅनडाने स्वत:साठी या संधीतून वेगळे होण्याची घोषणा केली. अमेरिकेची 'रॉलिंग स्टोन्स' ने शेकडो दस्ताऐवजाच्या हवाल्याने एक संशोधनात्मक रिपोर्ट प्रकाशित केला होता. या रिपोर्टमध्ये हे स्पष्ट करण्यात आले होते की कशा प्रकारे अमेरिकी प्रशासन बुशच्या नेतृत्वात जलवायु परिवर्तनाविषयी चुकीच्या भ्रामक सूचना पसरवून लोकांची दिशाभूल करुन समजविण्याचा प्रयत्न करीत आहे की, असा कोणताही धोका नाही.[३] अमेरिकी लॉबी 'स्टरेंडी रेडॉल' ला बुश प्रशासनामध्ये एक प्रमुख स्थान प्रदान करण्यात आले होते, ज्याने त्या सर्व वैज्ञानिकांच्या बडतर्फीची मागणी केली होती. हे सर्व वैज्ञानिक पर्यावरण प्रदूषणाच्या धोक्यावर शोधकार्य करीत होते.[४] मोठमोठ्या वैज्ञानिकांवर दबाव टाकण्यात येत होता की ते आपल्या शोधलेखांना बुश प्रशासन आणि मोठ्या औद्योगिक कंपन्याच्या इच्छेनुसार अशा प्रकारे प्रस्तृत करावे की पर्यावरण प्रदूषणाच्या धोक्याचा प्रभाव कमीतकमी वाटेल.

१) ''Why the earth summit matters', Observer, London 19-5-2002
२) Suson Delacourte, 'PM denies climate change', the star, Torento, 21-12-2006
३) Tinse Dickinson, 'The Secret campaign of Bush...', Rolling Stones, 26-8-2008.
४)Chiristian Aid Report (1999) as quoted in globalissues.org/print/ article/ 231.

काही वैज्ञानिकांनी या दबावाला त्रासून आपल्या पदाचा राजीनामा दिला.[१] असोसिएटेड प्रेसतर्फे करण्यात आलेल्या एका सर्वेक्षणात २७९ पर्यावरण वैज्ञानिकांपैकी प्रत्येक पाचमधून दोन वैज्ञानिकांनी ही तक्रार केली की त्यांचे संशोधन निष्कर्ष परिवर्तीत केले गेले आहेत आणि मूळ निष्कर्षाच्या विपरीत निष्कर्ष काढले गेले आहेत. निम्म्यापेक्षा जास्त वैज्ञानिकांनी हे सांगितले की, ग्लोबल वार्मिंग अथवा ऋतु परिवर्तनासंबधी मिळालेल्या तथ्यांना काढून टाकण्यासाठी प्रशासनाकडून दबाव टाकण्यात आला.[२] जानेवारी २००६ मध्ये नासाचे वैज्ञानिक डॉ. जेम्स हेंसनने एक मुलाखतीमध्ये हे रहस्योद्घाटन करुन सर्व जगाला आश्चर्यात टाकले की, जलवायु परिवर्तन आणि पर्यावरणाच्या धोक्याविषयी त्यांच्या संशोधनात्मक निष्कर्षांना जनतेसमोर न आणण्यासाठी त्यांच्यावर दबाव टाकला गेला आणि विचारांची अभिव्यक्ती स्वातंत्र्याचे नगारे वाजविणाऱ्या चॅम्पियन देशाच्या प्रशासनाने 'घातक परिणामा' (Dire Consequences) ची धमकी दिली आणि नासाच्या वैज्ञानिकांवर बंदी घालण्यात आली की त्यांनी पत्र-पत्रिका अथवा जनसंचाराच्या अन्य माध्यमांशी संपर्क अगर वार्तालाप प्रशासनाच्या परवानगीशिवाय करु नये. प्रशासनाच्या परवानगीने होणारे संभाषणसुद्धा उच्च अधिकाऱ्याच्या उपस्थितीतच होईल.[३]

पेनोरमा ने बुशच्या एका सल्लागाराची मुलाखात (प्रेस वार्तालाप) प्रकाशित केली. या चर्चेतून हे निष्पन्न झाले की त्यांनी इसवी २००० च्या निवडणुकीपूर्वी हा सल्ला दिला होता की, त्यांनी ग्लोबल वार्मिंगला नाकारावे आणि यासाठी त्या वैज्ञानिकांची सेवा घ्यावी जे याच्या धोक्याला अतिशय कमी करुन प्रस्तुत करु शकतील.[४]

भांडवलदारांच्या तेल आणि पोलाद कंपन्यांच्या सुरक्षितेची जबाबदारी या राजनेत्यांवर होती म्हणून त्यांच्या लाभात कोणत्याही प्रकारची कमतरता होऊ नये यासाठी प्रशासनाने मानवजातीचे अस्तित्व आणि त्यांची सुरक्षा दावावर लावली. या कार्यासाठी ज्ञान-विज्ञानाच्या माध्यमाने छल-कपट आणि असत्याची भरपूर मदत घेतली.

अमेरिकेच्या मोठमोठ्या कंपन्या (जसे तेल कंपनी एक्सॉन मोबिल) दिशाभूल करणारी पुस्तके प्रकाशित करीत राहते. या पुस्तकांच्या माध्यमातून सामान्य जनतेला विश्व स्तरावरील वैज्ञानिकांच्या सहमतिच्या विपरीत हे समजावण्याचा प्रयत्न केला जातो की,

---

१) Washington Post, 21-6-2007, Reuters 30 - 1 - 2007.

२) Joel Robert, 'groups say scientists...', CBS News 30 - 1 - 2007.

३) Andrew Rekin, 'Climate Expert say.....', Newyork Times, 29 - 1 - 2006.

४) Anup Shah: Climate Change & globalwarming intro@globlissues.org

ग्लोबल वार्मिंग काही मोठा धोका अगर चिंतेची बाब नाही. ब्रिटीश रॉयल सोसायटीनुसार एक्सॉन मोबिल कंपनीने १९९८ ते २००५ पर्यंत या उद्देशपूर्तीसाठी २.९ मिलीयन डॉलर खर्च केले.[१]

न्यूयॉर्क टाइम्सने १९९८ मध्ये एका पब्लिक रिलेशन फर्मच्या (जनसंपर्क संस्था) मेमोरेंडमचे रहस्यस्फोट केले होते. या गौप्यस्फोटात ऋतु परिवर्तनाविषयी उद्योग जगाच्या दृष्टिकोनाच्या समर्थनार्थ मोठ्या प्रमाणात वैज्ञानिकांना विकत घेणे आणि त्यांना पत्रकार, वैज्ञानिक आणि सामान्य जनतेला इंडस्ट्रीची वैचारिक कल्पना समजाविण्याचे प्रशिक्षण देण्याचा मानस व त्याचा तपशील प्रकाशित करण्यात आला होता. या मसुद्याचा बजेट पाच मिलियन डॉलर (२० कोटी रुपये) एवढा होता. केवळ २० श्रेष्ठ दर्जाच्या वैज्ञानिकांवर ६० लक्ष डॉलर (जवळपास ३ कोटी रुपये) खर्च करण्यात येणार होते.[२] ही अगदी तीच कपटनीती होती जी तंबाखू इंडस्ट्रीने कॅन्सर (कर्करोग) च्या धोक्याविषयी संशोधकांना रोखण्यासाठी अंगीकारली होती.

इ. सन २००९ च्या संमेलनापासून लोकांना अतिशय अपेक्षा होत्या. अमेरिकेचे अध्यक्ष ओबामा यांच्यासह ११० देशाच्या प्रतिनिधींना केवळ पर्यावरण संकटावर चर्चा करण्यास भाग घेतला. या चर्चेत अमेरिका टाळाटाळीची पूर्ववत भूमिकेवर अडलेला होता. क्योटो संधी रद्द झाल्यामुळे चर्चा पुन्हा नव्याने प्रारंभ करावी. बऱ्याच लांब काळापर्यंत चर्चा झाली परंतु निष्पन्न काहीच झाले नाही. ग्रीन हाउस गॅसेसच्या उत्सर्जनाचे कोणतेही लक्ष्य तर निर्धारित झाले नाही. उलट यापूर्वी ५० टक्के उत्सर्जनात कमी करण्याची धोकादायक घोषणाही लुप्त झाली. तात्पर्य या संम्मेलनाच्या निष्कर्ष एका अशा लकवाग्रस्त संधी कराराच्या रुपात समोर आली ज्यामध्ये प्रगतिशील देशांना कोणतेही निर्धारित लक्ष्य देण्यात आले नाही किंवा दुसरे कोणतेही उपर्युक्त असे मार्गदर्शनही यामध्ये करण्यात आले नाही.

यानंतरच्या संमेलनातही काहीही निष्पन्न झाले नाही. इ. सन २०१० मध्ये मॅक्सिको येथील संमेलनात सर्व संम्मतीने हे तर मान्य करण्यात आले की पर्यावरणाच्या हानीपासून सुरक्षितेसाठी १०० मिलीयन डॉलर बजेट निर्धारित करावे परंतु हा फंड कसा गोळा करावा आणि यात प्रगतिशील देशाचा किती वाटा असेल किंवा त्यांची काय भूमिका राहील याविषयी कोणताही ठरावा संमत झाला नाही. क्योटो संधीविषयी अंमलबजावणीचे

१) Guardian London, 20-9-2006.

२) 'Denial and Deception : A Chronicle of ExxonMobil's Efforts to Corrupt the Debate on Global Warming', Greenpeace, 2003-08-14.

पुढील पाऊल कोणते यावरही काही ठरविण्यात आले नाही.

इ. सन २०११ मध्ये 'डरबन' येथील संम्मेलनात या संधीला अंतिम प्रारुप देण्यासाठी चार वर्षाचा कालावधी निश्चित करण्यात आला. अर्थात इ. सन २०१५ पर्यंत ही संधी आपल्या अंतिम चरणात पोहचेल आणि पूर्ण रुपाने तयार होईल. परंतु अंमजबजावणीसाठी ती इ. सन २०१० मध्ये लागू होईल.

इ. सन २०१२ मध्ये 'दोहा' (कतरमधील एक शहर) येथील संमेलनात काही महत्त्वपूर्ण निर्णय संमत करण्यात आले, परंतु अमेरिका आणि कॅनडासोबत रशीया, न्युझिलंड, जपानसह कित्येक प्रगतिशील (भौतिकदृष्ट्या) देशांनी या निर्णयाशी बांधील राहण्यास आपले समर्थन देण्यास नकार दिला.

भौतिकदृष्टीने प्रगतिशील देशांच्या टाळाटाळीच्या वर्तवणुकीला कंटाळून वारसा येथील संमेलनातून (जे इ. सन २०१३ मध्ये झाले) १३२ देशांनी सभेतून बहिर्गमन केले. पर्यावरणासाठी काम करणाऱ्या अनेक खाजगी संस्थानीसुद्धा बहिर्गमन केले.

सुदैवाने बुश प्रशासनाच्या या प्रयत्नांना अमेरिकी जनतेचेच समर्थन न मिळाल्यामुळे पर्यावरणाशी संबधित संघटना, वैज्ञानिक, कायदेपंडित, विश्वविद्यालये आणि संशोधन संस्था यांच्या संघटित प्रयत्नांनी विज्ञान संबधीत ही धोकेबाजी त्वरीत उघडी झाली. परंतु सरकारी पातळीवर पर्यावरणाचे संतुलन स्थिर ठेवण्यासाठी प्रत्यक्षात होत असलेल्या प्रयत्नांशी असहयोगाची भूमिका आज ही कायम आहे.

## इस्लामी दृष्टिकोन

प्रकृतीशी संघर्षाचा परिणाम संकटाच्या रुपात समोर आला आहे. नवीन पाश्चिमात्य संस्कृती ज्या भौतिकवादी तत्त्वज्ञानावर उभी आहे त्यात मनुष्याला केंद्रीय स्थान प्राप्त आहे आणि मानव बुद्धी सर्वोच्च आहे. या कल्पनेमुळे मनुष्यात घमेंड व अहंकाराची भावना निर्माण झाली. याच्या गाभाऱ्यातून प्रकृतीशी संघर्ष करुन तिला पराजित करण्याच्या इच्छेने जन्म घेतला. यामुळे कोणत्याही पद्धतीने भौतिक सुख-शांती आणि विलासिताच्या साधनांची प्राप्ती हा एकमात्र उद्देश मनुष्याने आपल्या जीवनाचा निर्धारित केला. हा शुद्ध भौतिकवादी उद्देश जेव्हा नैतिक नियमरहित जीवनशैलीसोबत संलग्न झाला तेव्हा त्याने जो बिघाड निर्माण केला, त्या बिघाडाचा परिणाम पर्यावरण संकटाच्या रुपात समोर आला.

# सृष्टीची कल्पना

इस्लामच्या दृष्टीत ही सर्व सृष्टी अल्लाहने निर्माण केली यामध्ये कोणतीही वस्तू निरुपयोगी बनविली नाही.

"हे पालनकर्त्या, हे सर्वकाही तू व्यर्थ व निरुद्देश्य बनविलेले नाही." (दिव्य कुरआन, ३:१९१)

"आम्ही या आकाशाला व पृथ्वीला आणि या जगाला जे त्याच्या दरम्यान आहे व्यर्थ निर्माण केले नाही. ही तर त्या लोकांची कल्पना आहे ज्यांनी द्रोह केला आहे, आणि अशा अश्रद्धावंतांचा सर्वनाश आहे नरकाच्या अग्नीद्वारे." (दिव्य कुरआन, ३८:२७)

"हे आकाश व पृथ्वी आणि त्यांच्या दरम्यानातील वस्तू आम्ही काही खेळ म्हणून बनविल्या नाहीत. यांना आम्ही सत्याधिष्ठित निर्माण केले आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण जाणत नाहीत." (दिव्य कुरआन, ४४:३८-३९)

पवित्र कुरआन ही गोष्ट स्पष्ट करतो की ही पूर्ण सृष्टी आणि यामधील प्रत्येक वस्तू योजनाबद्ध आणि संतुलनासह निर्माण केली आहे.

"आकाशाला त्याने उंच केले आणि संतुलन प्रस्थापित केले. याची निकड अशी आहे की तुम्ही संतुलन बिघडऊ नका." (दिव्य कुरआन, ५५:७-८)

"ज्याने थरावर थर असे सात आकाश बनविले. तुम्हाला कृपावंताच्या निर्मितीत कोणत्याही प्रकारची विसंगती आढळणार नाही. पुन्हा वळून पहा, कोठे तुम्हाला काही उणीव दिसून येते का?" (दिव्य कुरआन, ६७:३)

ईशग्रंथ पवित्र कुरआन हेसुद्धा स्पष्ट करतो की, अल्लाहने निर्मित केलेल्या या सकल चराचर सृष्टीत कोणताही बदल येऊ शकत नाही. प्रकृती आणि त्याच्या संसाधनांना वशीभूत करुन त्यांच्यापासून सेवा प्राप्त करुन घेण्याची एक सीमा आहे. मनुष्याने कितीही प्रयत्न केले आणि कितीही प्रगतीशील झाला तरी तो अल्लाहच्या निर्धारित रितीला अगर कायद्याला तसेच त्याच्या निर्मित व्यवस्थेला बदलू शकत नाही.

"मग (हे पैगंबर (स.) आणि पैगंबरांच्या अनुयायांनो) एकाग्र होऊन आपले लक्ष या धर्माच्या दिशेत स्थिर करा. दृढ राहा त्या प्राकृतिक स्वभावावर ज्यावर सर्वश्रेष्ठ अल्लाहने मानवजातीला निर्माण केले आहे. अल्लाहने केलेली रचना बदलली जाऊ शकत नाही, हाच अगदी रास्त आणि योग्य धर्म आहे परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत." (दिव्य कुरआन, ३०:३०)

“हा अल्लाहचा शिरस्ता आहे जो अशा लोकांच्या बाबतीत पूर्वापार चालत आलेला आहे आणि तुम्हाला अल्लाहच्या परिपाठांत कोणताही बदल आढळणार नाही.”
(दिव्य कुरआन, ३३:६२)

अशा प्रकारे कुरआनने सृष्टीविषयी हा विश्वास निर्माण केला की ही सृष्टी एका विशिष्ट उद्देशाने विशेष क्रमबद्धतेत निर्माण करण्यात आली आहे.

यात संतुलन व्यवस्था स्थापित करुन एक योजना आणि आराखड्या (डिझाइन) सह निर्माण करण्यात आली आहे. कोणत्याही संतुलित व्यवस्थेमध्ये विघ्न आणि बाधा उत्पन्न करते. म्हणूनच या सृष्टीव्यवस्थेत ही मनमानी करता येणार नाही, तसेच त्याच्या संसाधनांचा अंधाधुंद वापर अर्थात अन्याय करता येणार नाही.

# खिलाफत आणि अमानतची संकल्पना

पवित्र कुरआन सांगतो की या सृष्टीचा अस्सल स्वामी मालक एकमात्र अल्लाह आहे. तो अल्लाह जो आपल्या जातीत यकता व स्वयंभू आहे आणि त्याचा कोणी सहकारी अगर भागीदार नाही. संपूर्ण सृष्टीची प्रत्येक वस्तू येथपर्यंत की, मनुष्याचे शरीर आणि त्याची मालमत्तासुद्धा प्रतिष्ठावान अल्लाहची देणगी आहे. अल्लाहने पैगंबराद्वारे लोकांकडून या सत्यतेची कबुली घेत असता पवित्र कुरआनमध्ये या शब्दांत त्याची अभिव्यक्ती करण्यात आली.

''यांना सांगा, दाखवा जर तुम्हाला माहीत असेल की ही पृथ्वी व हिची सर्व वस्ती कुणाची आहे? हे जरूर म्हणतील, अल्लाहची. सांगा, मग तुम्ही शुद्धीवर का येत नाही?'' (दिव्य कुरआन, २३:८४-८५)

मानवाला अल्लाहने या सृष्टीतील आपल्या निर्मितीत सर्वश्रेष्ठ निर्मिती म्हटले आहे आणि या सृष्टीच्या एका भागापासून लाभान्वित होण्यासाठी यामधील वस्तू त्याच्या अधिपत्यात दिल्या.

''त्याने पृथ्वी व आकाशांतील सर्वच वस्तू तुमच्या अधीन केल्या. सर्वकाही आपल्या जवळून, यात मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे गंभीरतापूर्वक विचार करणारे आहेत.'' (दिव्य कुरआन, ४५:१३)

''ही तर आमची मेहरबानी आहे की आम्ही मानवजातीला मोठेपण दिले आणि त्यांना खुष्की व जलमार्गावर वाहने दिली आणि त्यांना निर्मल पदार्थाचे अन्न दिले व आपल्या बऱ्याचशा निर्मितीवर स्पष्ट श्रेष्ठत्व प्रदान केले.'' (दिव्य कुरआन, १७:७०)

मानवाच्या अधिपत्यात यासाठी देण्यात आल्यात की, मनुष्याला अल्लाहने पृथ्वीवर आपला प्रतिनिधी (खलीफा) म्हणून निर्माण केले आहे, या दर्जाने त्याला अल्लाहने प्रदान केलेल्या संसाधनाचा अल्लाहच्या मर्जीनुसार संतुलित वापर करावयाचा आहे.

''तोच आहे ज्याने तुम्हाला भुतलावरील खलीफा (नायब) बनविला आणि तुमच्यापैकी काहींना काहींच्या तुलनेत अधिक उच्च दर्जे बहाल केले की ज्यायोगे जे काही तुम्हाला दिले आहे त्यात तुमची परीक्षा घ्यावी, निःसंशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यातही अत्यंत सत्वर आहे आणि फार क्षमाशील व दया करणारा देखील आहे.''

(दिव्य कुरआन, ६:१६५)

मनुष्याला त्याच्या उत्पत्तीच्या अगदी प्रारंभी घटनेचा उल्लेख अल्लाहने आपल्या अंतिम ग्रंथात या शब्दांत केला,

''आणि (आठवण करा) जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने दूतांना सांगितले की, ''मी पृथ्वीवर एक खलीफा (माझा प्रतिनिधी) बनविणार आहे.'' (दिव्य कुरआन, २:३०)

अल्लाहने मानवाला पृथ्वीवरील त्याच्या स्थिती अगर दर्जाविषयी स्मरण करवुन त्याला श्रद्धा बाळगण्याचे आवाहन केले.

''श्रद्धा ठेवा अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर आणि खर्च करा त्या वस्तूंपैकी ज्यावर त्याने तुम्हाला नायब (खलिफा) नियुक्त केले आहे. जे लोक तुमच्यापैकी श्रद्धा ठेवतील व माल खर्च करतील त्यांच्यासाठी महान मोबदला आहे.''

(दिव्य कुरआन, ५७:७)

# कर्माचा जाब द्यावयाची संकल्पना

पवित्र कुरआन सांगतो की या सकल चराचर सृष्टीचा निर्माता अल्लाहने मानवाला प्रदान केलेल्या प्रत्येक वस्तूविषयी त्याला जाब द्यावा लागेल.

"तोच आहे ज्याने तुम्हाला भुतलावरील खलीफा (नायब) बनविला आणि तुमच्यापैकी काहींना काहींच्या तुलनेत अधिक उच्च दर्जे बहाल केले की ज्यायोगे जे काही तुम्हाला दिले आहे त्यात तुमची परीक्षा घ्यावी, निःसंशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यातही अत्यंत सत्वर आहे आणि फार क्षमाशील व दया करणारा देखील आहे."

(दिव्य कुरआन, ६:१६५)

ही ती मूलभूत संकल्पना आहे जी या सृष्टीतील संसाधनांविषयी मनुष्याच्या हृदयात संवेदनात्मक जाणीव निर्माण करते. या अनुभूतीमुळे मनुष्य अधिकाराविषयी अनभिज्ञ नसतो. तो एका वेसणरहित उंटाप्रमाणे अर्थात स्वेच्छाचारी बनत नाही किंवा पाश्चिमात्य सभ्यतेप्रमाणे स्वतःला मोकाट अगर बेजबाबदार समजत नाही. जबाबदारीची ही अनुभूती मनुष्याला या सृष्टीतील अगर निसर्गातील संसाधनाचा वापर अगदी सतर्कपणे त्यांच्या संतुलन स्थिरतेच्या मर्यादेत राहून करण्यास बाध्य करते.

इस्लाम केवळ जाब द्यावयाच्या संकल्पनेला हृदयात जागृत करुन गप्प बसत नाही तर त्याच्या आधारावर पर्यावरणासंबधी नीती आणि नियमांची एक सशक्त भिंत उभी करतो. नैतिक आणि कायदेकानूनच्या माध्यमाचा वापर करुन तो मनुष्यावर पायबंद घालतो की, त्याने या भूतलावर पूर्ण जबाबदारीनिशी आपल्या कर्तव्याचे पालन करावे. पर्यावरणविषयी इस्लामी नैसर्गिक शिकवणींचे संक्षिप्त विवरण येथे प्रस्तृत करीत आहे.

### (१) साधे जीवन अंगीकारणे आणि भोग-विलासतेपासून सावधान राहण्याची शिकवण

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "साधे व सामान्य जीवन जगणे हा श्रद्धेचा भाग आहे." (हदीस- अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे की, "जगाची भोग-विलासता माझ्यासाठी नव्हे, मी तर एक प्रवासी आहे जो विश्रांती घेण्यास थोडा वेळ झाडाच्या सावलीत थांबतो आणि पुन्हा चालू लागतो." (हदीस- तिर्मिजी)

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, "जेव्हा तुमच्या दृष्टीस असा मनुष्य पडेल ज्याला अल्लाहने तुमच्यापेक्षा जास्त धनसंपत्ती ऐश्वर्य आणि सुंदरता दिली आहे तेव्हा तुम्ही त्या

व्यक्तीकडे बघा ज्याला अल्लाहने तुमच्यापेक्षा कमी दिले आहे.'' (हदीस- मुस्लिम)

आवश्यकतेपेक्षा जास्त वस्तूंची खरेदी व जमा करुन ठेवण्याच्या प्रवृत्तीवर आघात करीत पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, ''एक बिछाना पुरुषासाठी, एक पत्नीसाठी आणि एक पाहुण्यासाठी, चौथा बिछाना सैतानाचा होय.'' (हदीस- बुखारी)

काही भोग विलासाची वस्तू जसे दारु आणि ऐश्वर्याची साधने जसे पुरुषासाठी सोने व सोन्याच्या वस्तू आणि रेशम इत्यादी निषिद्ध घोषित केले. वैध (हलाल) वस्तूमध्येसुद्धा सावधगिरी बाळगण्याची आणि संतुलन स्थिर ठेवण्याची शिक्षा दिली.

**(२) संसाधनांच्या वापरात संतुलन आणि आवश्यकतेपेक्षा जास्त संसाधनांना गरीबांमध्ये वाटप करण्याचा निर्देश**

पवित्र कुरआनच्या ७ व्या अध्यायातील ३१ व्या आयतीत अल्लाहने स्पष्टपणे सांगितले की, ''आणि खा, प्या परंतु मर्यादांचे उल्लंघन करू नका, अल्लाह मर्यादेच्या बाहेर जाणाऱ्यांना पसंत करीत नाही.''

मनुष्याजवळ त्याच्या गरजेपेक्षा जास्त सामग्री असेल तर कुरआन त्याचा वायफळ उपयोग अगर खर्च करण्यास अयोग्य अगर अनुचित करार देतो आणि या फाजील सामग्रीला गरजवंताला देण्याचा अगर त्यांच्यावर खर्च करण्याचा आदेश देतो.

''नातेवाईकाला त्याचा हक्क द्या आणि गरीब व वाटसरूला त्याचा हक्क. वायफळ खर्च करू नका. वायफळ खर्च करणारे शैतानचे बंधू होत, आणि शैतान आपल्या पालनकर्त्याशी कृतघ्न आहे.'' (दिव्य कुरआन, १७:२६-२७)

''ते तुम्हाला विचारतात की काय खर्च करावा? सांगा की जे काही आवश्यकतेपेक्षा अधिक असेल.'' (दिव्य कुरआन, २:२१९)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले की, ''काही उंट सैतानाचे असतात आणि काही घरेसुद्धा! सैतानाच्या उंटाना मी बघितले आहे की, एक मनुष्य काही उंटांना घेऊन जात होता आणि त्याच्यावर कोणीही स्वार झालेला नव्हता. त्या उंटाना खाऊ घालून इतके लठ्ठ केले होते की तो स्वत:ही त्याच्यावर स्वार होत नव्हता आणि आपल्या भावालाही स्वार होऊ देत नव्हता.'' (हदीस- अबू दाऊद)

**(३) वस्तुंना (साधने) नष्ट करण्यास सक्तीने मनाई केली.**

''जेव्हा त्याला सत्ता प्राप्त होते, तेव्हा पृथ्वीतलावर त्याची सारी धावपळ केवळ याचकरिता असते की उपद्रव माजवावे, शेतीचा विध्वंस करावा व मानवजात नष्ट करावी - वास्तविक पाहता अल्लाह (ज्याला तो साक्षी ठरवीत होता) त्याला उपद्रव मुळीच

आवडत नाही.'' (दिव्य कुरआन, २:२०५)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अज्ञानाने तर्कवितर्क करणे, विनाकारण जास्तीचे प्रश्न उभे करणे, माल (संपत्ती) नष्ट करणे, स्वत: काही न देणे परंतु दुसऱ्याकडे मागणे, आईची अवज्ञा आणि मुलींना जीवंत जमिनीत पुरणे यापासून मनाई केली आहे.

(हदीस- बुखारी)

ईशमार्गदर्शनाच्या प्रकाशात अंतिम ईशपैगंबरांनी (स.) स्थापिलेल्या आदर्श ईशशासनाचे प्रथम खलीफा माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) यांनी इस्लामी सेनेच्या प्रमुखाला निर्देश देत सांगितले,

''कोणत्याही फळफळणाऱ्या वृक्षाला कापू नका.''

''कोणत्याही वसलेल्या जमिनीला ओसाड करु नका.''

''कोणत्याही बकरी किंवा उंटाला खाद्यान्नाच्या गरजेशिवाय दुसऱ्या कोणत्याही कारणास्तव जबह (ठार) करु नये.''

''मधमाशांना जाळू नये किंवा त्यांना अस्तव्यस्त करु नये.''

(हदीस- मुअत्ता इमाम मालिक)

**(४) संपूर्ण सृष्टी अल्लाहचा एक परिवार आहे कोणत्याही जीवधारी प्राण्यांना हानी पोहचविण्यास सक्तीची मनाई !**

जनावरे, पक्षी व वनस्पती, लहान-मोठे किडे सर्व काही अल्लाहचे कुटुंब आहे. त्यांची सुरक्षा ही आमची जबाबदारी आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले की, ''ही सकल चराचर सृष्टी अल्लाहचे एक कुटुंब आहे. अल्लाहला तो अतिशय प्रिय आहे जो त्याच्या कुटुंबासाठी लाभदायक आहे.'' (हदीस- मिश्कात)

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, ''कोणत्याही सजीव प्राण्याला विनाकारण आपल्या नेमबाजीने ठार मारणाऱ्या व्यक्तीचा अल्लाहने धिक्कार केला आहे.'' (हदीस- बुखारी, मुस्लिम)

**(५) वृक्षांना विनाकारण कापण्यास मनाई करण्यात आली आणि वृक्ष लावण्याची शिकवण देण्यात आली.**

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, ''जो ओसाड जमिनीला हिरवीगार टवटवीत बनवेल त्याला त्याचे प्रतिफळ मिळेल. या जमिनीपासून प्राप्त खाद्यान्न खाण्यात येईल तो त्याच्यासाठी पुण्याचे कार्य होईल व दान करण्याचा मोबदला त्याला अल्लाह देईल.

(अर्थात झाडे व त्यापासून प्राप्त फळे अथवा खाद्यान्नाचा उपभोग, मनुष्य, पशु, पक्षी करतील ते सर्व त्याच्यासाठी पुण्य कार्य ठरेल.)'' (हदीस- मुसनद अहमद)

अर्थात ओसाड जमिनीला हरित करणाऱ्याला भौतिक लाभाव्यतिरिक्त आध्यात्मिक लाभ ही प्राप्त होईल.

अल्लाहचे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अशा वृक्षांना कापण्यास सक्तीने निषिद्ध केले जे मनुष्य आणि प्राणीमात्रांना जंगलात सावली प्रदान करतात.

(हदीस- अबू दाऊद)

सामान्य स्थिती असो की युद्धाचा प्रसंग पर्यावरणाचे रक्षण हे मानवाचे कर्तव्य ठरविले. युद्धाच्या कायद्यात याला सामील करण्यात आले. यापूर्वीसुद्धा या हदीसचा आम्ही उल्लेख केला आहे की, माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) इस्लामी सैन्याच्या सेनापतीला अगदी बजावून सांगतात, ''लक्षात ठेवा-

कोणत्याही फळयुक्त झाडाला कापू नका.

कोणत्याही वसलेल्या (आबाद) जमिनीला (वीरान) ओसाड करु नका.

कोणत्याही शेळी अथवा उंटाला खाद्यांन्नाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही गरजेसाठी बळी चढवू देऊ नका.

मधमाशीला जाळू नये किंवा अस्ताव्यस्त करु नका.''

## (६) पाण्याच्या वापरात दक्षता बाळगण्याची शिकवण

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पाण्याच्या उपभोगात सावधानी बाळगण्यास बजावले. माननीय अब्दुल्लाह बिन उम्र बिन आस (रजि.) म्हणतात, एक वेळ पैगंबर मुहम्मद (स.) माननीय साद (रजि.) यांच्या जवळून जात असता त्यांनी माननीय साद (रजि.) यांना वुजू (नमाजसाठी चेहरा, हात, पाय धूणे) करताना पाहिले. वुजूमध्ये पाण्याचा वापर आवश्यकतेपेक्षा जास्त होत आहे हे बघून पैगंबरांनी माननीय साद (रजि.) यांना विचारले, 'पाण्याचा हा वायफळ खर्च का आहे?' ते म्हणाले, 'हे अल्लाहचे रसूल! काय वुजूमध्ये ही व्यर्थ खर्च होतो?' पैगंबर म्हणाले, 'होय! मग तुम्ही नदीकाठी बसूनही वुजू करीत असाल तरीसुद्धा याची काळजी राखा.' (हदीस- मुसनद अहमद)

## (७) प्राकृतिक संसाधानावर सर्वांचा समान हक्क

ईशपैगंबर मुहम्मद (स.)यांनी फर्मावले, ''कोणालाही गवत, पाणी अथवा अग्नी

घेण्यापासून वंचित करु नका अथवा अडवू नका या वस्तू (अनिवार्य) आवश्यकता आहे आणि दुर्बलांचा सहारा आहे.'' (हदीस- अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) याविषयी सक्तीची ताकीद करीत फर्माविले, ''प्रलयानंतर हिशेबाचे दिवशी अल्लाह तीन प्रकारच्या लोकांकडे पूर्णतया दुर्लक्ष करेल त्यांच्याकडे बघणारसुद्धा नाही आणि त्यांच्यासाठी कठोर यातनांचे दंड आहे. या तीनपैकी एक व्यक्ती तो आहे ज्याच्या अधिकारात त्याच्या गरजेपेक्षा जास्त पाणी आहे आणि त्याने दुसऱ्या लोकांना अगर प्रवाशांना उपभोग घेण्यापासून वंचित केले.'' (हदीस- बुखारी)

पाणी हे प्रकृतीचे मानवाला दिलेले बक्षीस होय. मनुष्य त्याचा मालक नव्हे. ''मुहम्मद (स.) यांनी पाण्याचा व्यापार करण्यास निषिद्ध ठरविले.'' (हदीस- मुस्लिम)

उपरोक्त विश्लेषणाने ही गोष्ट अगदी स्पष्ट होते की, पाण्यासारख्या अमूल्य जीवन प्रदान वस्तूचा वापराच्या नावावर वायफळ खर्च आणि व्यापाराच्या आजच्या भौतिक समाजात प्रचलित प्रकारांना इस्लाममध्ये कोणताही थारा नाही.

**(८) लोकांना नुकसान अथवा हानी पोहचविणाऱ्या कृत्यांना निषिद्ध घोषित केले.**

''कोणालाही त्रास देणे निषिद्ध आहे, मग त्याचा तुमच्याकडून प्रारंभ असो किंवा कोणाच्या कृत्याच्या प्रतिक्रियेत असो, कोणत्याही स्थितीत ते योग्य नाही.''

(हदीस- मुअत्ता इमाम मालिक)

पैगंबर एका प्रसंगी म्हणतात, ''जो दुसऱ्याला त्रास देईल त्याला अल्लाह त्रास देईल आणि जो दुसऱ्याला नुकसान पोहचवेल अल्लाह त्याला नुकसान पोहचवेल.''

(हदीस- तिर्मिजी)

आपण याची सक्तीची ताकीद करीत म्हणालात, ''तो व्यक्ती कदापिही स्वर्गात प्रवेशा प्राप्त करु शकणार नाही ज्याचा शेजारी त्याच्या अन्याय अथवा अत्याचारापासून सुरक्षित नाही.'' (हदीस- मुस्लिम)

# आमचे कर्तव्य

मानव या भूतलावर अल्लाहचा प्रतिनिधी (खलीफा) आहे अर्थात तो विश्वातील प्राकृतिक संसाधनांचा संरक्षक आहे. या ईशसत्यावर श्रद्धा बाळगण्याची घोषणा करणारे लोक अर्थात मुस्लिम समुदायाची जबाबदारी अधिक वाढते या अनुषंगाने पर्यावरण संकटाच्या विरोधात मुस्लिमांनी शक्तिशाली निषेध करायला पाहिजे होते, नव्हे त्यांनी तर पर्यावरण संकटाच्या विरोधी आंदोलनाची ध्वजा हातात घ्यायला पाहिजे होती. परंतु दुदैवाने ते या गंभीर संकटाप्रति अनभिज्ञच नव्हे तर त्याच्या निर्मितीत सहभागी आहेत. सर्वसाधारण मुस्लिम या संकटापासून अनभिज्ञ आहे. विद्वान, वक्ते आणि धार्मिक संस्था याला एक धार्मिक आणि इस्लामी समस्या म्हणून प्रस्तुत करण्यास तयार नाही आणि मुस्लिम देश या संकटाच्या निवारण्यासाठी नैतृत्वाची भूमिका बजावण्यास तयार नाही.

मागील काही वर्षात काही ठिकाणी विशेषत: पश्चिमी देशाच्या इस्लामी संघटनामध्ये या समस्येप्रति जागरुकता आली आहे.

इस्लामिक फाउंडेशन फॉर एनवाइरोमेंटल अँड इकॉलोजिकल स्टडीज (IFEES) (अर्थात पर्यावरण आणि जीवशास्त्र व वनस्पती शास्त्रामधील परस्पर संबध) आई एनवाइरो (I Enviro) आणि लंडन इस्लामिक नेटवर्क फॉर दी एनवाइरोमेंट सारखे संघटन इस्लामी दृष्टिकोनानुसार पर्यावरणाच्या सुरक्षिततेसाठी कार्य करीत आहे. कॅनाडामध्ये इस्लामी विचारधारांचे तरुणांनी फेथ ऑफ लाइफ या नावाने एक प्रोजेक्ट याच उद्देशपूर्तीसाठी कार्यरत केले आहे. या प्रोजेक्टच्या अंतर्गत वेस्ट डाइवर्जन (Waste Diversion) अर्थात मुस्लिम वस्तीतील कचऱ्याला पर्यावरणाच्या दृष्टीने उपयुक्त अशा पद्धतीने रिसाइकल (Recycle) आणि करण्याचे अभियानही प्रारंभ केले आहे. ''ऑरगॅनिक इफ्तारच्या नावाने पर्यावरणाच्या दृष्टीने उपयुक्त अशा खाद्यान्नांना समाजात प्रचलित करण्याचा प्रयत्न होत आहे. आमच्या देशात केरळ येथील इस्लामी तरुणांची संस्था 'सॉलीडेरिटी'ने अनेक पर्यावरण विरोधी योजनांचा विरोध करुन त्यांना स्थगित करण्यात यश प्राप्त केले ज्या पर्यावरणास घातक होत्या. हे काही प्रयत्न आणि त्याची सफलता या गोष्टीकडे संकेत करतात की, मुस्लिमांनी आपल्या जबाबदारीची जाणीव ठेऊन अल्लाहने प्रदान केलेल्या बक्षीसांचा योग्य वापर करुन त्यांच्या सुरक्षितेसाठी महत्त्वपूर्ण भूमिका अदा करु शकतात. या भौतिकवादी आणि स्वार्थी जगात पर्यावरण सुरक्षेसाठी निस्वार्थ भावनेने जर कोणी कार्य करु शकेल तर ते मुस्लिम होय.'' (कारण त्यांची ही गाढ श्रद्धा आहे की ही समस्त सृष्टी एकमेव अल्लाहची निर्मीती आहे आणि

मनुष्य या भूतलावर त्याचा खलीफा आहे त्याच्या आदेशाची अवहेलना ही कृतघ्नता होय. या सृष्टीची निगा राखणे आणि समस्त मानवास उपयुक्त आणि कल्याणकारी नैसर्गिक वातावरण कायम राखणे हे त्याचे कर्तव्य आहे. हे नश्वर जीवन केवळ त्याच्या जीवनाची परीक्षा होय. या मूलभूत सिद्धांतावर ज्याचा जितका विश्वास असेल तितकी निस्वार्थतेची भावना त्याच्या अंतर्मनी जागृत होईल-अनुवादक).

**या कार्यासाठी काही संभावित प्रस्ताव येथे नमूद करीत आहोत.**

१) शुक्रवारच्या नमाजप्रसंगी खुतबा (प्रवचन) प्रसंगी अन्य सभा व प्रवचनांचे आयोजन, संमेलन इत्यादी कार्यक्रमाच्या माध्यमातून जनजागृती करणे. विशेषकरुन मुस्लिम समाजाला जागृत करण्याचा प्रयत्न करणे.

२) आमची मशीदे, घरे, वस्त्या इत्यादी स्वच्छ आणि हरित राहतील याविषयी दक्षता बाळगणे. पर्यावरणास हानिकारक कोणतेही कार्य येथे होणार नाही याची काळजी घेणे. गृहिणी व त्यांचे स्वयंपाक घर, मुले व तरुण पिढी यांना पर्यावरणास अनुकूल वातावरणात उपयुक्त शिक्षण देऊन जागृती निर्माण करणे. याशिवाय व्यापारी आणि उद्योगपती यांना पर्यावरणास अनुकूल उद्योग आणि ग्राहकांमध्येसुद्धा पर्यावरणास लाभदायक खरेदीप्रति चेतना जागृत करावी.

३) तरुण पिढी आणि तरुणांच्या इस्लामी आणि इतर संघटनांनी पर्यावरणाच्या सुरक्षिततेसाठी पर्यावरण सुरक्षा सहाय्यक संस्था स्थापित करुन योजनाबद्ध कार्य करावे.

४) पर्यावरणविषयी इस्लामी दृष्टिकोन आणि ईशनिर्धारित जीवनशैलीविषयी संशोधनात्मक कार्य करुन प्रकाशित करावे.

५) पर्यावरण सुरक्षितेसाठी जी आंतरराष्ट्रीय संमेलने होतात त्यामध्ये या संघटनांनी सक्रिय भूमिका घ्यावी. ईशआदेशानुसार योग्य आणि यथार्थ सिद्धांतावर आधारित प्रस्ताव पारित करण्याचा प्रयत्न करावा.

६) इस्लामी विद्वानांनी "इस्लामी पर्यावरणशास्त्र" (Figh of Enviroment) च्या विकासाचा प्रयास करावा. या वर्षी इस्लामी फिकह ॲकडमी इंडिया च्या बुरहानपूर (MP) येथील अधिवेशनात काही चर्चा अवश्य झाली आहे यात सतत प्रगति व्हायला पाहिजे.

(पर्यावरणाच्या संकटापासून मानवजातीचे संरक्षण करणे हे आमचे कर्तव्य होय. मनुष्य या भूतलावर अल्लाहचा खलीफा आहे. तो स्वतःच्या दुष्कृत्याविषयी या सृष्टीतील प्रत्येक बिघाडासाठी जबाबदार आहे. कारण तो सर्वात श्रेष्ठ आहे. हे कार्य प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे परंतु येथे आम्ही ज्या लोकांना जास्त जबाबदार समजले ते मुस्लिम

होय कारण ते या सत्यावर श्रद्धा बाळगतात या अनुषंगाने त्यांची जबाबदारी वाढते - अनुवादक).

**शासनासमक्ष निम्नलिखित मागण्या ठेवाव्या.**

१) भारत सरकारने क्योटो लागू करण्यास प्रभावी भूमिकेचे वहन करावे. भारताने नेतृत्व करुन शक्तिशाली देशांना प्रभावी पर्यावरण संधीवर अंमलबजावणीस बाध्य करावे. क्योटो संधीसोबत अन्य लाभदायक मुद्यांवर स्पष्टपणे संधी करावी. मानवतेच्या रक्षणार्थ भारताने उत्साहाने जगाचे नेतृत्व करावे.

२) भोग-विलासाच्या प्रवृत्तीला वेसन घालावे. पर्यावरणाला हानिकारक वस्तूंवर कर वाढवावा. (जसे एअर कंडीशनर्स, वातानुकूलित गाड्या इत्यादी) अकारण खाजगी वाहनांच्या जागी सामान्य जनता ट्रांसपोर्टला प्राधान्य द्यावे.

३) भोग-विलासाशी संबधित उद्योग व्यवसाय जे हवा, पाणी दूषित करुन गरीब जनतेच्या समस्या वाढवित आहेत. अशा लोकांकडून याचा मोबदला वसूल करावा. अर्थात प्रदूषण कर (Environtment Tax) लावावा. या करापासून प्राप्त राशी गरीबांच्या समस्या सोडविण्यात खर्च करावी.

४) जीवनाश्यक आणि नैसर्गिक साधने विषेशत: पाण्याच्या निर्जीकरणावर त्वरीत बंधन घालावे. पाण्याच्या उपलब्धतेच्या स्थितीचे अवलोकन करुन शीतपेये (Cold drinks)च्या उद्योगास पाण्याचा कोटा निर्धारित करावा.

५) संरक्षित विकास (Sustainable Development) च्या कल्पनेला व्यावहारिक रुपात प्रचलित करण्यास प्रभावी कायदा आणि जागतिक पातळीवर संधी व त्याचे मानदंड निश्चित करावे.

६) नैसर्गिक आणि ऑरगेनिक शेती पद्धत प्रचलनास प्रोत्साहन द्यावे अशी नियमावली निश्चित करावी जी वंश (Racial) संबधी परिवर्तन, कार्पोरेट शेती, रासायनिक खते आणि कीटकनाशक औषधी, कृत्रिम हार्मोन्स इत्यादींना कठोरतेने निराश करेल.

**- - समाप्त - -**